# नवभारत

जानेवारी २०१२

भारतीय राज्यव्यवस्थेच्या पुनर्रचनेची
दिशा व दृष्टी (उत्तरार्ध)

एन. जी. ओ.
सत्य आणि विपर्यास

'भूमीचे मार्दव' -
सृजनाचे वैभव

जनलोकपालाचे आंदोलन : व्यवस्थापरिवर्तनाच्या
दिशेने वाटचाल

माध्यम-साक्षरता :
एक आत्यंतिक गरजेची चळवळ

मराठी भाषेचे संवर्धित भवितव्य
काही दिशा

ग्रंथजिज्ञासा

सर विठ्ठलदास दामोदर ठाकरसी







अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**

**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत् आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्यांचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

**– संपादक मंडळ**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६५ । अंक ४ । जानेवारी २०१२
पौष/माघ शके १९३३
वार्षिक वर्गणी ३०० रुपये
या अंकाची किंमत रु. २०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संग्रहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका

# नवभारत

## जानेवारी २०१२

## अनुक्रमणिका

# भारतीय राज्यव्यवस्थेच्या पुनर्रचनेची दिशा व दृष्टी (उत्तरार्ध)

श्री. बाबूराव चंदावार

: १ :

स्वातंत्र्यातली राज्यव्यवस्था संसदीय लोकशाहीतली असावी, हे ज्या परिस्थितीत मानले गेले होते, ती परिस्थिती अन्य कोणताच पर्याय उपलब्ध नसल्याचीच होती. पण, स्वातंत्र्याला अनुसरूनच राज्यव्यवस्था असावी, एवढे मात्र वाटतच होते! अर्थात या दिशेने पर्यायाचे शोधन मात्र करता आलेले नाही. कारण, ब्रिटिश साम्राज्याने राज्यव्यवस्थेची जी घडी बसवलेली होती, त्यातूनच स्वातंत्र्यातली राज्यव्यवस्था उदयाला आणण्याचा प्रयत्न केला गेला. कारण, ब्रिटिश राज्यव्यवस्थेचे झालेले संस्कार नाकारून त्यातून बाहेर पडणे शक्य झालेच नाही. म्हणून ते जमलेही नाही. ही अवस्था भारतीय स्वातंत्र्याच्या भूमिकेला साजेशी नव्हती. हेच मुळात लक्षात घेता येत नसल्यामुळे स्वातंत्र्याला अनुसरून राज्यव्यवस्था निर्माण करणे शक्य होत नाही आहे! याचा अर्थ स्वातंत्र्याच्या जाणिवेत ज्या काही उणिवा राहून गेल्या होत्या त्यामुळेच पर्याय शोधण्याच्या दृष्टीने प्रयत्न होऊ शकले नाहीत, असा करायला हवा. कारण, स्वातंत्र्याच्या सत्याग्रह संघर्षात महात्मा गांधींनी ज्या 'हिन्द-स्वराज्या'ची कल्पना केली होती, ते स्वातंत्र्याच्या सत्याग्रह संघर्षातले मुख्य आकर्षण राहिलेलेच नव्हते. ब्रिटिश साम्राज्य भारतातून नाहीसे व्हावे एवढ्याच एका नकारात्मक भूमिकेतून याकडे पाहिले गेले होते. म्हणून, सकारात्मक भूमिकेच्या अभावी ब्रिटिश राजवटीतल्या संस्कारांशीच जुळवून घेऊन किंवा तडजोड करून राज्यकारभाराची संसदीय कार्यपद्धती अनुसरली गेली व तिलाच लोकशाहीची राज्यव्यवस्था मानलेही गेले. यात स्वातंत्र्याच्या मूळ भूमिकेला बाजूला सारले गेले व यातून स्वातंत्र्याला अनुसरून पर्याय शोधण्याला अग्रस्थान वा अग्रमान मिळू शकला नाही. ही खरीखुरी स्थिती किंवा वस्तुस्थिती मान्य करूनच लोकशाहीच्या सध्याच्या व्यवस्थेबाबतीत विचार करायला हवा. पण, हा विचार केलाच जात नाही आहे. कारण, हा विचार करण्याच्या दृष्टीने जी वैचारिक व मानसिक तयारी ज्यांची असू शकते व आहे तेच अत्यल्प मतात असल्यामुळे त्यांच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष केले गेले आहे. हे एका अर्थी महात्मा गांधींच्या 'हिन्द-स्वराज्या'कडे दुर्लक्ष करण्यासारखेच आहे. पण, महात्मा गांधींचेच नाव पुढे करून त्यांच्या इच्छेनुसारच लोकशाहीची सध्याची राज्यव्यवस्था स्वीकारली गेली व राबवलीही जाते आहे, असे म्हटलेही जाते आहे. याकडे बारकाईने पाहिल्यास लक्षात येईल, की महात्मा गांधींना अपेक्षित 'हिन्द-स्वराज्य' ज्यांना मुळातच मान्य नव्हते अशांनीच महात्मा गांधींच्या नावाचा (गैर) वापर करून स्वतःला मान्य असलेली राज्यव्यवस्था स्वीकारली व राबवली आहे, असेच दिसून येईल. अशाही स्थितीत महात्मा गांधींच्या 'हिन्द-स्वराज्या'च्या प्रेरणेतून जे सक्रिय राहू शकले होते, त्यांपैकी थोड्यांनीच स्वातंत्र्याला अनुसरून राज्यव्यवस्थेचे स्वरूप घडवायला हवे, याचा आग्रह धरला होता. यांतले काही प्रत्यक्ष राजकारणात होते व बरेच राजकारणाच्या बाहेर राहिले होते. जे राजकारणात होते त्यांना वाटले होते, की राजकारणात राहूनच महात्मा गांधींच्या 'हिन्द-स्वराज्या'कडे परिस्थितीला वळवता येऊ शकेल. पण, हा एक भ्रमच ठरला. म्हणून असे काही राजकारणात तळपत राहिले व जनमानसावर त्यांचा प्रभावही पडत राहिला होता. तरीही त्यांना याचे सकारात्मक राजकारण करता आले नाही व त्यांचे राजकारणही नकारात्मकतेत थिजूनही गेले. यात समाजवाद्यांचा प्रामुख्याने उल्लेख करायला हवा. कारण, समाजवाद्यांनी महात्मा गांधींची दृष्टी स्वीकारून राजकारण केले होते, असे ते सदैव म्हणत आले व त्यात तथ्यही आहे. पण, (स्व.) डॉ. राममनोहर लोहिया वगळता कोणत्याच समाजवाद्यांना राजकीय परिस्थितीत महात्मा गांधींना अपेक्षित राजकारण करता आले नाही. म्हणूनच असेल कदाचित, समाजवादी राजकारणावर प्रभाव

अनुक्रमणिका






पाडण्याच्या दृष्टीने सक्षम ठरू शकले नसावेत. फक्त (स्व.) डॉक्टर राममनोहर लोहियांनीच त्यांच्या प्रतिभा-शक्तीतल्या सक्रियतेतून राजकारणावर प्रभाव पाडला होता व राजकारणाला महात्मा गांधींच्या उद्देशाकडे वळवण्यात त्यांची या बाबतीतली निष्ठा व्यक्त झाली होती. उरलेल्या समाजवादी पक्षावर (स्व.) जवाहरलाल नेहरूंचा जो काही प्रभाव पडला, त्यातून समाजवादी पक्ष नुसता क्षीणच झाला नाही, तर तो संपुष्टातही आला. यातही (स्व.) मधु लिमये व (स्व.) किसन पट-नायकसारखे व महाराष्ट्रात (स्व.) इंदुमती केळकर व (स्व.) आचार्य श्रीपाद केळकर यांसारखे समाजवादी व त्यांच्या 'लोहिया विचार मंचा'तले सहकारी, 'महापुरे झाडे जाती तेथे लव्हाळी राहती' या न्यायाने तगून राहिले व त्यांनी डॉ. लोहियांची परंपरा यशस्वीपणे चालवली. पण, महात्मा गांधींना अपेक्षित होते त्या राजकारणाचा प्रभाव जनमानसावर पडू शकला नाही. कारण, यासाठी ज्या एका व्यूहरचनेची आवश्यकता होती, तीच करता आली नाही. तेव्हा, भारतात स्वराज्याच्या भूमिकेतला निष्ठावान म्हणूनच समाजवादी पक्षाकडे पाहिले जाणे रास्तच आहे. पण, समाजवाद्यांनीही राजकीय सत्तेच्या आकर्षणातलेच राजकारण केले होते, हेदेखील लक्षात घ्यायला हवे. कारण अशा राजकारणामुळेच (स्व.) जवाहरलाल नेहरूंना अपेक्षित होते ते राजकारण करण्या-साठी समाजवाद्यांना स्वतःकडे वळवता आले होते. यात समाजवादी निष्ठा बाळगून असणारे अल्पमतात गेले व (स्व.) नेहरूंनी त्यांना अपेक्षित 'समाजवादी समाज रचने'च्या भुवनेश्वराच्या काँग्रेस अधिवेशनात दिलेल्या घोषणेकडे आकर्षित होऊन बहुसंख्य समाजवादी तिकडे वळले. अशा तऱ्हेने समाजवादी पक्षच क्षीण होत गेला व सध्याच्या परिस्थितीत तो स्वतःचे अस्तित्वही गमावून बसला आहे. उत्तरप्रदेश व बिहारमध्ये डॉ. लोहिया व मधु लिमये या दोघांना मानणारे समाजवादी राजकारणात अद्यापही पाय रोवून आहेत; पण त्यांच्या कणखरपणाला सुरुंग लावला जातो आहे. तात्पर्य एवढेच, की राजकीय पक्षांचे प्रयोजन व उपयुक्तता या दोन्हींचा विचार करता लक्षात येईल, की स्वातंत्र्याला अनुसरून राजकीय व्यवस्था निर्माण करण्याच्या बाबतीत यातून अद्याप तरी अपेक्षित ते साध्य करता आलेले नाही. अर्थात, हे शक्यही नव्हते. कारण, स्वातंत्र्याच्या संदर्भात राजकीय पक्षांचे प्रयोजन व उपयुक्तता या दोन्ही सिद्ध करता येणे मुळातच शक्य नव्हते व शक्य नाही. अर्थात, ब्रिटिश पद्धतीत पक्ष, विरोधी पक्ष व अनेकविध पक्ष अशी रचना मान्य असल्यामुळे हीच रचना योग्य मानून त्याचे अनुकरण या देशात केले गेले. कदाचित हेच मुळात योग्य नसावे. कारण, लोकशाहीत पक्षपद्धतीच अपरिहार्य ठरते असा जो समज करून घेतला गेला व त्याचा आग्रहही बाळगला गेला, तो मुळातच पायाशुद्ध नसावा व नाही, असेच शेवटी म्हणावे लागते!

: २ :

स्वातंत्र्याला अनुसरून संसदीय लोकशाहीच्या पद्धतीत राज्यकारभार निर्माण करण्यासाठी राजकीय पक्षांचे प्रयोजन व उपयुक्तता या दोन्हींचा स्वीकार केला गेला यात चूक झाली असण्याची शक्यता नाकारता येत नाही. म्हणूनच राजकीय व्यवस्थेचे लोकसहभागातले स्वरूप उलगडायला हवे आहे याचा जो काही आजवर विचार केला गेला, त्याची पुसट का होईना रूपरेखा मांडण्याचा प्रयत्न झाला आहे व तो 'लोकस्वराज्य' या संकल्पनेच्या द्वारा स्पष्ट केला गेला आहे. या प्रयत्नात उणिवा असू शकतात व आहेतही. पण, स्वातंत्र्याच्या संदर्भात राजकीय व्यवस्था निर्माण करण्याच्या प्रयत्नात एक दिशासूचन यातूनच होऊ शकते व झालेलेही आहे, एवढे मात्र लक्षात घ्यायला हवे. अर्थात, याची मूळ पीठिका लोकांच्या लोकशाहीत राजकीय पक्षांचे प्रयोजन मुळातच नाही, अशा मान्यतेवरच आधारलेली आहे, हेही लक्षात घ्यायला हवे.

भारतीय राज्यघटनेच्या आदेशानुसारच निवडणूक आयोगाची निर्मिती केली गेली आहे. पण, भारतीय राज्य-घटनेने राजकीय पक्षांचे अस्तित्व असणे गरजेचे मानूनच राजकीय पक्षांना मान्यता दिलेली नाही, हेदेखील स्पष्ट आहे. म्हणून, निवडणूक आयोगाच्या वतीने राजकीय पक्षांच्या कार्यपद्धतीला कशासाठी मान्यता दिली असावी, असा एक प्रश्न उपस्थित केला जाऊ शकतो. पण, हेच केवळ या वेळी महत्त्वाचे मानणे अपेक्षित नसल्यामुळे स्वातंत्र्याला अनुसरून राजकीय व्यवस्था कशी निर्माण

करता येऊ शकेल, हेच प्रामुख्याने या ठिकाणी पाहणे अपेक्षित आहे, व म्हणून त्याचे प्रतिपादन करण्याकडे वळणे अगत्याचेही झालेले आहे.

निवडणुकीतला प्रौढ मतदान हा संसदीय लोकशाहीचा प्रमुख व महत्त्वाचा उपचार मानला जातो. कारण, यातूनच लोकप्रतिनिधी निवडले जातात. यासाठी मतदारक्षेत्रांची निर्मिती केली गेलेली आहे. लोकसभा, विधानसभा, जिल्हापरिषद, पंचायत समिती व ग्रामपंचायत या सर्वांची वेगवेगळी मतदारक्षेत्रे आहेत. या मतदारक्षेत्रांत राजकीय पक्षांचे, त्यांच्या गट वा युत्यांचे तसेच अपक्ष उमेदवार नेमले जातात. त्यांचा प्रचारही केला जातो. यासाठी आचारसंहिता निर्माण केली जाते. यावर निवडणूक आयोगाचे अधिकारी निवडणुकीतले गैरप्रकार टाळण्यासाठी आपले नियंत्रण ठेवून असतात. यात राज्याच्या पोलिस प्रशासनाची, होमगार्ड संघटनांची मदत घेतली जाते. अलीकडे केन्द्रीय राखीव सुरक्षा दलांचा व अर्धसैनिक दलांचाही वापर केला जातो. नक्सली–माओवादी प्रभाव-क्षेत्रात सीमा सुरक्षा सैनिक दलांचाही उपयोग केला जातो. अशा सर्व शक्तींचा वापर करूनही निवडणुकांत होणारे गैरप्रकार टळत नाहीत, हे अनुभवाला येतच असते. यात जेवढी व ज्या तऱ्हेची शक्ती लावली जाते, ती संसदीय लोकशाहीसाठी निवडणुकीचा उपचार म्हणून आवश्यक मानली जाते; त्यासाठीच गरजेचे मानलेही जाते. निवडणुकीचे निकाल जाहीर केले जातात व ज्यांना बहुमत मिळालेले असते, ते लोकप्रतिनिधी, निवडून आल्याचे निवडणूक आयोगाच्या वतीने रीतसर घोषित केले जाते. अशा तऱ्हेने संसदीय लोकशाही अस्तित्वात येते. पण, ही बहुमताचीच लोकशाही असल्यामुळे हे बहुमत झालेल्या एकूण मतदानाच्या टक्केवारीतलेच असते. जसे पन्नास टक्के मतदान झाले असल्यास यात सव्वीस टक्के मत ज्याला मिळाली असतील त्याला विजयी घोषित केले जाते. ही मतदानाची टक्केवारी कमीत कमी असली, तरीही बहुमतातला उमेदवारच सर्व मत-दारांचा प्रतिनिधी होत असतो. एकूण शंभर टक्के मतदारां-पैकी पन्नास टक्के मतदान झाले असल्यास सव्वीस टक्के मतदान हे बहुमताचे मानले जाते. यामुळे शंभर टक्क्याच्या तुलनेत सव्वीस टक्के मतदान हे वास्तविक अत्यल्प मतदानच असते व आहे. पण, बहुमताच्या लोकशाहीत याला अत्यल्प मतदानं मानलेच जात नाही. यामुळे अत्यल्प मतदान झालेला उमेदवार हाच लोक-प्रतिनिधी होतही असतो. तेव्हा, अशा तऱ्हेने अल्पमतदाना-तून निवडल्या गेलेल्या प्रतिनिधींतूनच अल्पमतातले शासन-कर्ते अस्तित्वात येतात. म्हणून, बहुमताची लोकशाहीही अल्पमतातून निवडून आलेल्यांना शासन करते व हे राज्यघटनेला मान्य असल्यामुळे याचा प्रतिवादही होत नाही. कारण, राज्यघटनेत तशी तरतूदच केली गेलेली नाही. तेव्हा, संसदीय लोकशाही अशा तऱ्हेने राजकीय खेळीतून अल्पमतातल्या प्रतिनिधींचीच असली, तरीही ती सर्वांवरच स्वतःचे वर्चस्व निर्माण करीत असते व करीत आलीही आहे. म्हणून, लोकांची लोकशाही या संकल्पनेला जो अर्थ प्राप्त झालेला आहे, तो स्वातंत्र्याच्या भूमिकेला विपरीत दिशेने नेणाराच असल्यामुळे अल्पमत-दानातून निवडलेले शासनकर्ते हे गुन्हेगारी पार्श्वभूमीचे असूही शकतात व आहेतही! याची टक्केवारी दिवसेंदिवस वाढत जात आहे. म्हणून, गुन्हेगारी पार्श्वभूमीचे उमेदवार लोकप्रतिनिधी होतात व त्यांतलेच शासनकर्ते होतात, ही वस्तुस्थिती नाकारता येत नाही. यामुळे निवडणुक पद्धती-तलेच हे दोष मानून चालण्यासारखे नसते व नाही. एकूणच संसदीय लोकशाहीची संकल्पनाच लोकाभिमुख नसल्याच्या वस्तुस्थितीतलेच हे आहे! पण, याला पर्यायच उपलब्ध नसल्याचे सांगून व ते लोकांच्या मनावर बिंबवून निवडणूक प्रक्रियेतून अस्तित्वात आलेले शासन, हे लोकांचे म्हणजे लोकशाहीचेच असल्याचे भासवले जाते व त्याचे संरक्षणही केले जाते. तेव्हा, यावर उपाययोजना करण्याची गरज आहे. अर्थात, तयार पर्याय जगात कुठेही उपलब्ध नाही, तो प्रयत्नातूनच निर्माण करावा लागतो याची शक्यताही आहेच. पण, संसदीय लोकशाहीची जी परंपरा निर्माण झाली आहे, त्यात जातीय, वर्गीय व धार्मिक इत्यादी हितसंबंध निर्माण झाल्यामुळे व या परंपरेतून बाहेर पडण्याची इच्छाशक्तीच नसल्यामुळे एक स्थिति-स्थापकता (स्टेट्सको) आलेली आहे. यातूनच गुन्हेगारी पार्श्वभूमी अधिकाधिक प्रमाणात विस्तृत होत चाललीही आहे. यातून मार्ग तर काढायलाच हवा. पण तो मार्ग कोणता असू शकेल, याचा विचार करायला हवा!

: ३ :

पर्यायाचा विचार करताना लोकशाहीतला लोकांचा प्रत्यक्ष सहभाग व लोकाभिक्रम याच दोन प्रमुख बाबी लक्षात घ्यायला हव्यात. कारण, स्वातंत्र्याला अनुरूप लोकांच्या राज्यव्यवस्थेच्या बाबी यातूनच लक्षात घेतल्या जाऊ शकतात. लोकांच्या वा मतदारांच्या मतदारसंघांच्या रचनेपासूनच याचा प्रारंभ करायला हवा. कारण, मतदार संघ घडवण्याचा उद्देश स्पष्ट असल्याशिवाय लोकसहभाग व लोकांचा अभिक्रम या दोन गरजांची पूर्तता होऊ शकणार नाही. सर्वच निवडणुकांचे मतदारसंघ लोकाभिक्रम जागवण्यासाठी व यातून लोकसहभाग निर्माण व्हावा या मूळ उद्देशातूनच घडवले जातात. पण बहुमतांच्या निकषामुळे हा उद्देश मागे पडलेला आहे व गैरमार्गाने मते मिळवण्यासाठी चालनाही मिळाली आहे. म्हणून, राजकारण हे गैरमार्गानेच जाण्याचे झाले आहे. पण, मतदारसंघांची रचना लोकाभिक्रम निर्माण करण्यासाठी व लोकसहभाग प्राप्त करण्यासाठी करता येऊ शकेल. कारण, मतदारांना लोकाभिक्रमातून व सहभागातून जे अधिकार प्राप्त होतील, त्यांचा वापर करूनच गैरप्रकार थांबवता येणे शक्य आहे. कायदा व कायद्यांची प्रभावी अंमलबजावणी करूनही गैरप्रकारांना आळा घालता येणार नाही. कारण, याची प्रक्रियाच वेळकाढूपणाची व अनिश्चिततेची आहे. शिवाय कायदेशीर निर्णय ज्या आधारावर लावले जातात, ते आधारही खात्रीचे अथवा विश्वास करण्याजोगे नसतात. म्हणून, यामुळे गुन्हेगारी पार्श्वभूमी असलेल्यांचेच फावत असते, हेच सदोदित अनुभवाला येत असते! तेव्हा, मतदारसंघाच्या रचनेचा प्रश्न लोकाभिक्रम जागवून लोकसहभाग निर्माण करण्याच्या दृष्टीने सोडवता यायला हवा व ते शक्यही आहे.

सर्वच मतदारसंघांची बांधणी योग्य प्रकारे करता आल्यास राजकीय पक्ष व त्यांच्या गटांच्या किंवा युत्यांचे स्थान मतदारसंघात निर्माण होणारच नाही. म्हणजे पक्षनिरपेक्ष वा पक्षविरहित मतदार संघ निर्माण झाल्यास, त्यातून मतदारांचे स्वाभाविक व कायदेशीर अधिकार मतदारांना मिळू शकतील. म्हणून, मतदानाचा अधिकार, उमेदवार नेमण्याचा अधिकार, प्रतिनिधीवर नियंत्रण ठेवण्याचा अधिकार, प्रतिनिधी गैर मार्गाने गेला व जातच असला, तर त्याला परत बोलावण्याचा अधिकार मतदारांच्या अभिक्रमातले व सहभागातले असतील. हे या वेळी भारताच्या राज्यघटनेला मान्य नाही. म्हणून, याची मान्यता प्रथम मिळवायला हवी. क्रमशः याचा विचार करता येऊ शकेल.

**१. मतदानाचा अधिकार (राइट टू व्होट) :**

प्रौढ मतदानाचा अधिकार सर्वांनाच आहे. पण, त्याचे स्वातंत्र्यही मतदारांना हवे आहे. मतदानाच्या स्वातंत्र्यावर दबाव टाकण्याचा अधिकार कोणालाच म्हणजे कोणत्याही संघटना व राजकीय पक्षांना नसावा. याची संधीच मतदारसंघाच्या रचनेत असता कामा नये.

**२. उमेदवार नेमण्याचा अधिकार (राइट टू नॉमिनेशन) :**

राजकीय पक्ष, पक्षांच्या युत्या हे सर्वच उमेदवार नेमतात. हा अधिकार फक्त मतदारसंघालाच असावा. एकाहून जास्त उमेदवार असूच शकतात. पण, हे सर्व मतदार संघातलेच असावेत व यांनी व्यक्तिगत पातळीवरच आपले उमेदवारी अर्ज मतदारसंघाकडे द्यायला हवेत. याची योग्य ती छाननी करून मतदारसंघ उमेदवारांना निवडणुकीची अनुमती देईल. तेच उमेदवारांना मान्य करावयाला हवे.

**३. नियंत्रणाचा अधिकार (राइट टू कंट्रोल) :**

उमेदवार निवडून आल्यानंतर तो प्रतिनिधी होईल. त्यावर योग्य ते नियंत्रण ठेवण्याचा अधिकार मतदारसंघालाच असावा. कारण, लोकप्रतिनिधी मतदारसंघाने तयार केलेल्या जाहीरनाम्याचाच पुरस्कार करेल व त्याच्या अंमलबजावणीचा प्रयत्न करेल. यात चुकारपणा केला जात असल्यास किंवा कोणत्याही प्रकारचे अनैतिक आचरण प्रतिनिधीने केल्यास त्यावर योग्य ते नियंत्रण आणण्याचे कार्य मतदारसंघालाच करावे लागेल.

**४. प्रतिनिधीला परत बोलावण्याचा अधिकार (राइट टू रिकॉल) :**

प्रतिनिधी योग्य त्या मार्गाने जात नसेल किंवा गैरवर्तणूक करत असेल, तर त्याला प्रतिनिधिपदावरून परत बोलावण्याचा अधिकार (राइट टू रिकॉल) मतदारसंघाला असावा.

अशा तऱ्हेने चार तऱ्हेच्या जबाबदाऱ्या पार पाडणारा








मतदारसंघ असावा. याला निवडणूक आयोगाची मान्यता प्राप्त झालेली असावी. या दृष्टीने भारताच्या राज्यघटनेतच याची तरतूद करायला हवी. भारतीय राज्यव्यवस्था लोकाभिमुख करण्याचा प्रयत्न यातून केला जावा. मतदार वा लोकांचा अभिक्रम यातून निर्माण होऊ शकेल, या अपेक्षेनेच याकडे पाहिले जावे. लोकांचा राज्यव्यवस्थेत प्रत्यक्ष सहभाग निर्माण करण्याच्या दृष्टीने व लोकाभिक्रम अस्तित्वात आणण्याच्या दृष्टीने हे करावयाचे असल्यामुळे राजकीय पक्ष व त्यांच्या युत्यांना यात स्थान असणारच नाही, हे स्पष्ट आहे. पण, मतदार वा लोकांचा या बाबतीत जागृत करण्याचा व त्याची निरंतरता कायम करण्याचा प्रश्न महत्त्वाचा आहे. कारण, याच्या अभावी लोकांच्या प्रत्यक्ष सहभागाची राजकीय व्यवस्था अस्तित्वात येऊ शकणार नाही. म्हणून लोकांच्या समाजात निष्पक्ष, निर्वैर वृत्तीची जोपासना सदैव करीत राहणाऱ्यांची आवश्यकता असेल व निश्चितपणे याची पूर्तताही व्हावीच लागेल. या दृष्टीने विचार करताना लक्षात येईल, की राजकीय सत्तेच्या बाहेर राहूनच सत्तानिरपेक्षवृत्तीची जोपासना करणाऱ्यांची गरज भासेल. याची पूर्तता कशी होईल हा एक प्रश्न आहे व तो अतिशय महत्त्वाचाही आहे. अर्थात, सत्तानिरपेक्ष वृत्तीची जोपासना करणाऱ्यांचा समूह असणे मात्र गरजेचे आहे व त्याचे अगत्यही आहे. हे जर साधता येणार नसेल, तर राजकीय व्यवस्थेत लोकांचा प्रत्यक्ष सहभाग निर्माण व्हावा या दृष्टीने लोकाभिक्रम जागवताच येणार नाही, हे उघड आहे. तेव्हा, यावर विचार करताना समाजात सत्तानिरपेक्ष वृत्तीच्या निष्पक्ष व निर्वैर अशा व्यक्ती मुळातच असतात व म्हणूनच समाज अस्तित्वात येतो व तो चालतोही, यावर विश्वास ठेवायला हवा. ही वैधानिक बाब मानून चालणार नाही. कारण, वैधानिकतेतून निर्वैरता व निष्पक्षता जोपासता येतच नाही. म्हणून, अशा व्यक्तींच्या समूहांना 'घटनाबाह्य शक्ती' मानून त्यांची अवहेलना करू नये. कारण, अशा अवहेलनेतून निष्पक्ष व निर्वैर वृत्तीची जोपासना करताच येणार नाही. अर्थात, निष्पक्षता व निर्वैरता या दोन्ही सत्ताबाह्य सामाजिक शक्ती असल्यामुळे त्यांच्या अस्तित्वामुळे सामाजिक धारणा होत असते. तिला वैधानिकतेत बसवता येत नाही व बसवूही नये. कारण, हे मुळातच शक्य नसते व नाही. अर्थात, निष्पक्षता व निर्वैरता वैधानिकतेत नियंत्रित करता येत नाही व करूही नये. म्हणून, याची समाजधारणेची जी एक सुष्टतेची परंपरा अस्तित्वात आली वा येऊ शकली आहे, त्याकडेच पाहणे गरजेचे होऊन बसते. म्हणून, कोणतीही सुष्ट परंपरा वैधानिक नसते व नसूच शकते, हे गृहीत धरून वैधानिकतेचे स्तोम माजवू नये! कारण, घटनाबाह्य शक्तींचा हस्तक्षेप वैधानिक व्यवस्थेत होता कामा नये, असे राजकारणात मानले जाते व ते प्रतिष्ठितही केले गेले आहे. पण, समाज वैधानिकतेवर विसंबून राहून चालत नाही, ही वस्तुस्थिती लक्षात घेऊन वैधानिकता यामुळेच मर्यादित होऊन बसते, हे लक्षात घ्यायला हवे. अर्थात, समाजधारणा ही वैधानिकतेच्या मर्यादेत घडत नसते हे लक्षात घेऊन समाजधारणेत जी सहजीवनाची मूल्ये प्रतिष्ठित झालेली असतात व आहेत, त्यांचे महत्त्व मान्य करूनच वैधानिकतेला जपता येते व जपायलाही हवे. याची मानसिकता घडवायला हवी असते व ती हवीच आहे! हे दुर्लक्षून वैधानिकतेला प्रतिष्ठित व स्थिर करताच येत नाही, ही एक वस्तुस्थिती असल्यामुळे वैधानिकताच सर्वश्रेष्ठ असल्याची धारणा करून घेऊ नये. कारण, ही धारणा समाजघातक ठरू शकते व ठरलेलीही आहे. अर्थात, वैधानिकतेच्या अतिरंजितपणातून एकाधिकारशाही अथवा हुकूमशाही उद्‌भवते, हे दृष्टिआड करून चालणार नाही! तेव्हा, वैधानिकतेचे महत्त्व मान्य करूनही त्याहून जास्त महत्त्वाची सामाजिक धारणा असते व आहे, हे लक्षात घ्यायला हवे.

निष्पक्ष व निर्वैर वृत्तीची जोपासना सत्तानिरपेक्ष जाणिवेतून होण्याची शक्यता व वस्तुस्थिती लक्षात घेऊनच सत्ताबाह्य शक्ती या घटनाबाह्य वा वैधानिक बाह्य असल्या तरीही त्यांचा आदरच करायला हवा, व समाजघडणीत त्यांचे जेवढे योगदान होत असते व होऊ शकते, तेवढे राज्यघटना व वैधानिकतेमुळे होत नसते व नाही, हे मान्यच करायला हवे. नैतिक शक्ती म्हणून ज्याचा उल्लेख केला जातो ती शक्ती राज्यघटना व वैधानिकतेतून येत नसते. म्हणून ती वैधानिक नसते व घटनाबाह्यच असते. हे लक्षात घेऊनच समाजधारणेचा विचार केला जाऊ शकतो. या दृष्टीने रूपकाचा आश्रय घेऊन (रूपक

हा एक भाषालंकार) समाजधारणा कशी घडू शकते हे पाहता येईल. 'वसिष्ठ शक्ती' हे एक रूपक आहे. यात वसिष्ठऋषींच्या आश्रमात हिंस्त्र प्राणी व अहिंसक प्राणी एकत्र नांदत होते, असे मानले गेलेले आहे. याला ऐतिहासिक आधार आहे किंवा काय, या वादात न जाताच यावर विचार करणे अपेक्षित आहे. निष्पक्ष व निर्वैर शक्तीचे प्रतीक वशिष्ठ ऋषी मानले गेले आहेत. निष्पक्षतेतून व निर्वैरतेतून हिंसक व अहिंसक एकत्र राहू शकतात, हेच यातून प्रतिपादन केले आहे. हे तर्कशुद्ध व बुद्धिगम्य असेल किंवा काय, हे सांगता येत नाही; पण, हे सांत्वन देणारे आहे, एवढे तरी मानायलाच हवे! कारण, याशिवाय अन्य पर्यायच उपलब्ध नसतो व नाही. राज्यघटना व वैधानिकता या दृष्टीने सांत्वनकारी नसतात व नाहीत. तेव्हा, निखळ तर्कशुद्धता व बुद्धिगम्यतेपेक्षाही जास्त महत्त्व ज्यातून सांत्वन मिळू शकते व मिळते तेच मानायला हवे, व मानलेही जाते! तेव्हा, निष्पक्षता व निर्वैरता वसिष्ठांच्या आश्रमात होती किंवा काय, याच्या तर्कपद्धतीत न जाताच हे दोन्ही गुण समाजधारणेसाठी आवश्यक मानूनच स्वातंत्र्याच्या राज्यव्यवस्थेला ते लाभावेत अशी अपेक्षा करायला हवी व ते स्वीकारायला हवे. याचे विनोबांनी 'वसिष्ठ शक्ती' असे नामकरण केलेले आहे. आचार्य जावडेकरांच्या 'आधुनिक भारत' या ग्रंथात 'यतीं'ची व त्यांच्या संघाची म्हणजे 'यतिसंघा'ची कल्पना केलेली आहे. पण, 'वसिष्ठ शक्ती' या शब्दप्रयोगात विशिष्ट प्रकारचे 'गुणदर्शन' केले गेले आहे. म्हणून, स्वातंत्र्याच्या राज्यव्यवस्थेला 'वसिष्ठ शक्ती'ची दीक्षा मिळायला हवी, ही अपेक्षा करणे सर्वच दृष्टीने योग्य होईल!

: ४ :

भारताला राजकीय स्वातंत्र्य प्राप्त झाल्यानंतर जगातली अनेक राष्ट्रे स्वतंत्र झाली. याची प्रेरणा भारतीय स्वातंत्र्याच्या चळवळीतल्या सत्याग्रहातून झाली, असे मानले जाते. पण, भारताच्या सभोवतालची सध्याची परिस्थिती स्वातंत्र्याच्या आस्थेहून विपरीत दिशेला जाणारीच आहे, असे वाटू शकते! म्हणून, अफगाणिस्तान, पाकिस्तान, भूतान, नेपाळ, बांगलादेश व श्रीलंका या सर्वच राष्ट्रांमधून जी परिस्थिती निर्माण झालेली आहे, ती भारताच्या स्वातंत्र्याला निश्चितपणे घातक ठरू शकते, याची यथायोग्य नोंद घ्यायला हवी. अफगाणिस्तान व पाकिस्तान ही दोन्ही राष्ट्रे तालिबानी व अमेरिकी साम्राज्यवादाच्या चक्रव्यूहात अडकून पडलेली आहेत, व स्वातंत्र्याच्या विपरीत दिशेनेच ती जाताना दिसत आहेत. भारताच्या शेजारी सर्वांत बलाढ्य देश चीन आहे. चीनने तिबेट गिळंकृत केला व नेपाळही गिळंकृत करेल की काय, असे वाटू लागलेले आहे. एकूण ईशान्य भारतावर याची काळी सावली पडलेली असून भारत–चीन सीमेवर सैनिक-संघर्षाची स्थिती निर्माण झालेली दिसत असून चीनचे भारतीय भूमीवर होत जाणारे आक्रमण हा भारताच्या राष्ट्रीय सुरक्षेच्या दृष्टीने चिंतेचा विषय होऊन बसलेला आहे. पाकिस्तानमधून बांगलादेश अस्तित्वात आला. म्हणून, याचा फायदा भारताला मिळाला असावा, असे सकृत्दर्शनी तरी वाटत नाही. बांगलादेशीय शरणार्थ्यांचा भारतात प्रवेश करीत जाण्याचा क्रम अद्याप थांबलेला नाही. शिवाय चीनचा प्रभाव बांगलादेशवर पडतोच आहे, असेही म्हटले जाते आहे. भारताच्या दक्षिणेस खाली श्रीलंका-तमिळ व सिंहली संघर्षात-वेळी-अवेळी राष्ट्रीय आणीबाणीच्या परिस्थितीतून जात असतो. याचा उपसर्ग भारताच्या तमिळनाडू राज्याला होतच असतो. अशा सर्वच परिस्थितीत भारतावर याचा विपरीत परिणाम होणे स्वाभाविकच आहे, असे म्हणायला हवे. म्हणून भारतीय राज्यव्यवस्थेला स्थैर्य देण्याचा प्रश्न महत्त्वाचा ठरतो. कारण, भारताच्या राजकीय स्थैर्यावरच सभोवतालच्या राष्ट्रांतले स्थैर्य अवलंबून आहे व भारताकडून या दृष्टीने सभोवतालच्या राष्ट्रांना योग्य ते दिशादर्शन होणारच नसेल, तर चीनचे दिशादर्शन या राष्ट्रांना मिळत राहील, हे निश्चित आहे. म्हणून, प. बंगालमधून उदयास आलेला नक्सलवाद व नेपाळमधून भारतात पोचलेला माओवाद या दोहोंच्या संगनमतातून भारताच्या राजकीय स्थैर्यावर अनिष्ट परिणाम होऊ शकेल. अर्थातच, हे गृहीत धरून भारताच्या राजकीय व्यवस्थेची पायाशुद्ध पुनर्रचना करणे गरजेचे होऊन बसलेले आहे!

राजकीय व्यवस्थेची पायाशुद्ध पुनर्रचना, ही मुळातच पायाशुद्धीवर भर देणारी असावयाला हवी. कारण, राजकीय व्यवस्था जेवढ्या सहजपणे निर्माण केली जाऊ

शकेल तेवढ्याच सहजपणे ती पायाशुद्ध ठेवणे शक्य होईल, असे मानू नये व मानताही येत नाही. कारण, राजकीय व्यवस्था पक्षपद्धतीतूनच निर्माण करण्याचा जो या देशात प्रयत्न करण्यात आला, त्यातून स्वातंत्र्याला अनुरूप राज्यव्यवस्था अस्तित्वात आणणे शक्य झालेले नाही. म्हणून, पक्षपद्धतीतून लोकशाही अस्तित्वात आणण्याचे प्रयत्न हे तसे अपयशीच ठरल्याचे म्हणायला हवे! पण, जे प्रयत्न झाले त्यातून एकीकडे नक्सली व माओवादाला कळत न कळत चालना मिळू शकली. दुसरीकडे फॅसिझम्लाही चालना मिळाली. दोन्हीमध्ये शोषण आणि हिंसेचे अधिष्ठान निर्माण झाले आहे. नक्सली-माओवादाने जरी क्रांतीचा संकल्प सोडलेला असला, तरी नक्सली-माओवादाने अद्याप क्रांतीची व्यूह-रचना वा 'रणनीती' साधलेली नाही आहे. क्रांतीच्या व्यूहरचनेअभावातून हिंसेचीच व्यूहरचना होऊ शकलेली आहे. म्हणून, अशा व्यूहरचनेतून गुन्हेगारी दुष्प्रवृत्तीचीच कार्यपद्धती अस्तित्वात येणे शक्य होत असल्यामुळे नक्सली-माओवाद क्रांतीची भूमिका त्यागून निव्वळ हिंसेचीच भूमिका स्वीकारू शकलेला असावा, असेच वाटते! याविषयी नक्सली-माओवाद्यांनी त्यांना अपेक्षित क्रांतीची भूमिका स्वीकारून आपल्या सदोष व्यूहरचनेचा पुनर्विचार करावयाला हवा. अर्थात क्रांतीची व्यूहरचना करता येत नसल्यामुळे हिंसेच्याच व्यूहरचनेत नक्सली-माओवाद अडकून पडलेला आहे, याची योग्य ती दखल नक्सली-माओवाद्यांनी घ्यायला हवी! अन्यथा नक्सली-माओवादाची गुन्हेगार संघटना म्हणून जी प्रतिमा निर्माण झाली आहे, ती पुसली जाणारच नाही, हे निश्चित आहे.

: ५ :

राजकीय पक्षांनी लोकशाहीच्या नावाने जे राजकारण केले, ते अनेकानेक पद्धतींनी गैरमार्गानेच केलेले असल्या-मुळे, यातून त्यांची प्रतिमा भ्रष्टाचाऱ्यांचीच प्रतिमा असावी तशी झालेली आहे. म्हणून, राजकारण व राजकारणी म्हणजे भ्रष्टाचाराचे कुरण, अशीच एक प्रतिमा यांची निर्माण झालेली आहे! पण, राजकीय पक्षांना सत्ताकांक्षा असल्यामुळे यापोटीच गैरमार्गातले दुष्कर्म करण्यापासून राजकीय पक्ष मुक्त राहू शकलेले नाहीत. म्हणून, जे दुष्कर्म राजकीय पक्षांनी केलेले आहे, ते सर्व फॅसिस्ट प्रवृत्तीचेच ठरलेले आहेत! म्हणजे एका अर्थी राजकीय पक्षांनी दुष्कर्म करून फॅसिझमला पोषणच दिलेले आहे, असे म्हणायला हवे. अर्थात, यातून राजकीय पक्षांची सुटका होणे आता अशक्यच झालेले आहे! तेव्हा, राजकीय पक्षांनी स्वतःला राजकीय विचारसरणीतून सत्तेच्या आकांक्षेपोटी वेगळे करून घेतल्यामुळे, या राजकीय पक्षांची राजकीय कृतिशीलता फॅसिझममध्येच परिवर्तित होणे सहज होते व तेच नेमके झालेले आहे. तेव्हा, नक्सली-माओवाद्यांनी क्रांतीची व्यूहरचना करण्याचेच टाळल्यामुळे जसे ते गुन्हेगारी प्रवृत्तीकडे वळले आहेत, तसेच राजकीय पक्ष लोकशाहीच्या विचारसरणीचा त्याग करूनच सत्ताकांक्षेतून फॅसिझमचा अंगीकार करू शकलेले आहेत. म्हणून, या दोन्हींतून स्वातंत्र्याला अनुरूप भारताची राजकीय व्यवस्था घडवायची अपरिहार्यता निर्माण झाली असून ही अपरिहार्यताच स्वातंत्र्याला अनुरूप राजकीय व्यवस्था निर्माण करण्याच्या दृष्टीने महत्त्वाची ठरलेली आहे!

अर्थात, राजकीय व्यवस्थेची पुनर्रचना नक्सली–माओवादातली गुन्हेगारी व तसेच राजकीय पक्षांच्या फॅसिझममधली गुन्हेगारी या दोन दुष्प्रवृत्तींपासून मुक्त ठेवता यायला हवी. याच दृष्टीने राजकीय व्यवस्थेच्या पुनर्रचनेचा विचार केला जाऊ शकतो व तो करायलाही हवा. अर्थात, अन्य कोणत्याही दृष्टीतून याचा विचार करू नये!

☆☆☆

# एन. जी. ओ. : सत्य आणि विपर्यास

प्रा. व्ही. डी. गायकवाड

एन. जी. ओ. या बिगर राजकीय संघटनेची संकल्पना ही जगात भांडवलशाही राष्ट्रांनी भांडवलशाही, साम्राज्यशाही, वसाहतवाद यांच्या समर्थनार्थ व साम्यवादाच्या विरोधात जगभर प्रसारित केलेली संकल्पना आहे. म्हणजे एन. जी. ओ. हे एका अर्थाने भांडवलशाही व्यवस्थेने निर्माण केलेले एक षडयंत्रच होय. सध्याच्या जागतिकीकरणाच्या, उदारीकरणाच्या व मुक्त अर्थव्यवस्थेच्या युगात एन. जी. ओ. चा मोठ्या प्रमाणात सुकाळ झालेला आहे. विकसनशील देशांतील विद्रोही, परिवर्तनवादी, कामगार, कम्युनिस्ट चळवळी नष्ट करण्यासाठी वापरण्यात येणारे हे अशासकीय शस्त्र होय. बालमजुरी प्रथा निर्मूलन, भ्रष्टाचार निर्मूलन, मानवी हक्क, पर्यावरण, पिळवणूक, अत्याचार, महिला सक्षमीकरण इ. प्रश्नांवर गोंडस पद्धतीने संशोधन व समस्या सोडविण्याचे नाटक करत उदारवादी लोकशाहीच्या आडून भांडवलशाहीचे समर्थन करण्याचा प्रयत्न या एन. जी. ओ.मार्फत विकसित देश करत आहेत. नवीन जागतिक व्यवस्थेमध्ये अशासकीय संस्था फार महत्त्वाच्या ठरलेल्या आहेत. युनोने अशा अशासकीय संस्थांना सल्लागाराचा दर्जा बहाल केलेला आहे. साम्राज्यशाहीच्या विरोधाच्या भावना बोथट करणे व शोषित जनतेचे प्रतिनिधित्व करणाऱ्या साम्यवादाऐवजी त्याला पर्याय निर्माण करणे हा एन. जी. ओ.चा उद्देश आहे. कामगारवर्गीय विचारसरणीला दुसरा पर्याय देणे आणि त्यांना साम्यवादी चळवळीपासून परावृत्त करणे हे त्याचे उद्दिष्ट आहे. वर्गीय सत्ता मुळातच उलथून टाकू नये यासाठी 'सनदशीर मार्गाने' कामगार, कर्मचारी, कष्टकरी, शेतकरी, दलित-आदिवासी व महिला यांच्यातील असंतोषाची हवा काढून घेण्यासाठी एन. जी. ओ.चा वापर साम्राज्यवाद्यांकडून योजनाबद्ध रीतीने करण्यात येत आहे.

१

आज एन. जी. ओ. या वेगवेगळ्या नावांनी जगभर ओळखल्या जातात. त्यात सेवाभावी संस्था, व्हॉलंटरी एजन्सीज, ग्रासरूट ऑर्गनायझेशन, ॲक्शन ग्रुप्स, जन आंदोलन, नागरी समिती, निष्पक्षीय राजकीय संस्था, फाउंडेशन, प्रतिष्ठान इ. नावांनी या अराजकीय स्वयंसेवी संस्थांची नोंदणी होत असते. सामाजिक, सांस्कृतिक, आर्थिक, पर्यावरण, मानवी हक्क अशा जीवनाच्या सर्व अंगांना स्पर्श करणाऱ्या त्यांच्या कार्यामुळे या सार्वत्रिक चर्चेचा विषय बनलेल्या आहेत. तसेच या अशा संस्था भूतदयावादी दृष्टिकोणातून संकटग्रस्त लोकांना सहकार्य करणे, विधायक समाजकार्य करणे, आर्थिक दृष्ट्या दुर्बल घटकांचा विकास करणे, आदिवासींचे, आरोग्याचे प्रश्न, शिक्षणाचे सार्वत्रिकीकरण इ. उद्देशांनी कार्य करत असल्याचा दावा करत असतात. अशा संस्थांना परदेशांकडून मिळणाऱ्या पैशाचे प्रमाण प्रचंड वाढलेले आहे. एन. जी. ओ. म्हणजे परदेशी पैसा असं एक समीकरणच बनलेले आहे. एन. जी. ओ. ची ओळख ही आता व्यवस्थेचे समर्थक, साम्राज्यवाद्यांचे हस्तक, डाव्या चळवळीचे विरोधक अशी होत चाललेली आहे. सन २०१० मध्ये एन. जी. ओ. च्या माध्यमातून आलेला परकीय पैसा हा १०,००० कोटींच्यावर गेलेला आहे. आपल्या देशात परदेशातून येणारा अमाप पैसा कुठल्या उद्देशाने येत आहे, त्यातून काय साधलं जात आहे, याबाबत शंका उत्पन्न व्हायला लागलेल्या आहेत. परदेशातून येणारा हा पैसा दिवसेंदिवस सरकारला कठीण जाणार आहे. परदेशी पैशाशिवाय एन. जी. ओ.ना मिळणारा देशी पैशाचा प्रवाह मोठ्या प्रमाणात वाढत आहे. कारण राजकीय पुढारी, निवृत्त नोकरशहा व कॉर्पोरेट सेक्रेटरी ही एन. जी. ओ.ची निर्मिती करत आहेत. शासकीय फंडिंगसोबतच देशातील कॉर्पोरेट सेक्टरकडून मिळणाऱ्या फंडिंगचे प्रमाणही वाढत आहे. मोठे उद्योगपती धार्मिक संस्थाकडून टॅक्स रिबेटची सवलत वापरून टॅक्स कमी करण्याच्या उद्देशाने देण्याच्या या मार्गाने येणाऱ्या देशी

अनुक्रमणिका

पैशाचे प्रमाण हे परदेशी पैशापेक्षा जास्त वाढत आहे.

बिगर राजकीय संस्थांचा विकास हा १९ व्या शतकात झाला. वसाहतवादी काळात ह्या संस्थांचा विशेष प्रसार झाला. उदा., रॉकफेलर फाउंडेशन, कर्निज फाउंडेशन, फोर्ड फाउंडेशन इ. त्याची ठळक उदाहरणे आहेत. वासाहतिक देशांत पिळवणुकीविरुद्ध असंतोष खदखदत असताना या संस्था जन्माला घातल्या गेल्या. वसाहतवादी देशांचे कुरूपत्व लपविण्यासाठी अशासकीय संस्थांना मानवतावादी चेहरा देऊन साम्राज्यवादी शक्तीच्या विरोधातील असंतोष बोथट करण्याचा प्रयत्न झाला. २० व्या शतकाच्या सुरुवातीला जगभर वसाहतवाद व साम्राज्यवादी विचारधारेचा उदय होऊ लागला होता. साम्यवादी व्यवस्थेच्या विरोधात लढण्यासाठी या अराजकीय संस्थां स्थापन करण्यात आल्या. साम्यवादाविरुद्ध लढण्यासाठी या संस्थांना प्रचंड निधीचा पुरवठा करण्यात आला व येत आहे. नवसाहतिक किंवा आर्थिक जागतिक व्यवस्थेत एन. जी. ओं.ना खूप महत्त्व आलेले आहे. तेव्हा विकसित राष्ट्रांनी नवीन व्यूहरचना व डावपेचाची आखणी करायला सुरुवात केली. त्यासाठी युनो, त्यांच्या साहाय्यक संस्था, लष्करी गट, ब्रेटन वुड, गॅट, डब्ल्यूटीओ, बहुराष्ट्रीय कंपन्या, आयएमएफ अशा संस्थांद्वारे जागतिक स्तरावर आर्थिक साम्राज्यवाद्यांनी एन.जी.ओ.ना नव्या स्वरूपात पुढे आणलेले आहे.

वरील सर्व एन. जी. ओ. निर्मितीचा उद्देश साम्राज्यशाहीच्या विरोधाच्या भावना बोथट करणे व शोषित जनतेचे प्रतिनिधीत्व करणाऱ्या साम्यवादाऐवजी त्याला पर्याय निर्माण करणे हा होता.

२

## भारतातील एन. जी. ओ. :

भारतात ब्रिटिशाची सत्ता स्थापन होताच ख्रिस्ती धर्मप्रचाराचे कार्य करून ब्रिटिश सत्तेला समर्थन देण्यासाठी व ब्रिटिश सत्तेविरुद्धची राष्ट्रीय चळवळीतील जनता चळवळीपासून बाजूला नेण्यासाठी ख्रिस्ती मिशनऱ्याच्या स्वरूपात भारतात पहिल्यांदा एन.जी.ओ.ची सुरुवात झाली. त्यासाठी रॉक फेलर या फाउंडेशनने त्यासाठी मोठ्या प्रमाणात पैसापुरवठा केलेला होता, असे अनेक पुराव्यांवरून सिद्ध झालेले आहे. साम्राज्यवाद्यांच्या दृष्टिकोणातून भारताचा ईशान्य भाग व भारताच्या तेलंगणा भागातील शेतकऱ्यांच्या कम्युनिस्ट पक्षांच्या नेतृत्वाखालील आंदोलनाने दुसऱ्या महायुद्धानंतर साम्राज्यवादाची झोप उडवली होती. तसेच भारतात या आंदोलनाला आळा घातला नाही, तर साम्यवादाचा उदय व्हायला वेळ लागणार नाही; तेव्हा फोर्ड फाउंडेशनने भारताकडे लक्ष घालायला सुरुवात केली. भारतात ग्रामीण भागाला साम्यवादापासून रोखण्यासाठी अमेरिकापुरस्कृत एकात्मिक ग्रामीण विकासाचे कार्यक्रम राबविण्यात सुरुवात झाली. याच दरम्यान फोर्ड फाउंडेशनचे शिष्टमंडळ (१९५१) भारतात भेट देण्यास आले व त्यांच्याच शिफारशीवरून १९५२ला समुदाय विकास कार्यक्रम सुरू झाला. १९५७ ला समुदाय विकास कार्यक्रम अपयशी ठरला, तेव्हा फोर्ड फाउंडेशनच्या सूचनेवरूनच अपयशाची कारणे शोधण्यासाठी केंद्र सरकारने बळवंतराव मेहता समितीची स्थापना केली. या समितीने स्थानिकांचा असहभाग यामुळे ही योजना असफल झाली आहे, निष्कर्ष काढला. तेव्हा जनतेचा स्थानिक पातळीवर सहभाग वाढविण्यासाठी एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रम सुरू करण्यात आला. भारतात तेव्हापासून आजपर्यंत अनेक भारतीय सेवाभावी संस्था फोर्ड फाउंडेशनच्या मदतीने चालतात. त्यात गांधी शांती प्रतिष्ठान, नागालँड पीस मिशन (जयप्रकाश नारायण), ऑपरेशन ब्रह्मपुत्रा, लोकायत (रजनी कोठारी), गांधी स्मारक निधी, सर्वसेवा संघ, आवार्ड इ. संस्था होत. वरील गांधीवादी नावाच्या संस्था दीर्घकाळापासून साम्राज्यवाद्यांचे हस्तक बनून काम करत आहेत. सध्या भारतात सरकारी पातळीवर केंद्र सरकारच्या ग्रामीण विकास खात्यामार्फत 'कपार्ट' ही संस्था एन. जी. ओ.च्या समन्वयाचे कार्य करते. साम्राज्यवादी आणि त्यांच्या स्थानिक हस्तक असलेल्या एन. जी. ओ.वर विकास कामात सहभागी होण्याबरोबरच साम्राज्यवादाविरोधातील लढा कमकुवत करण्याची जबाबदारी सोपविली गेली आहे. या एन.जी.ओ. द्वारे साम्राज्यवाद्यांना हस्तक्षेप करणे सोपे जाते. जवाहरलाल नेहरू मेमोरियल फंड, कमला नेहरू हॉस्पिटल ट्रस्ट, इंदिरा गांधी फाउंडेशन इ. नेहरू व गांधी घराण्याशी संबंधित प्रतिष्ठानांना करसवलतीच्या नावाखाली मोठ्या प्रमाणात देणग्या दिल्या








जातात. या देणग्यांद्वारे ज्या कंपन्यांकडे, उद्योगपतींकडे कोट्यवधी रुपयांची करमुक्त संपत्ती आहे अशांना करचुकवेगिरी करण्यासाठी सुरक्षित मार्ग दाखविला जातो.

आज वेगवेगळ्या राजकीय पक्षांच्या, संघटनांच्या अनेक एन. जी. ओ. स्थापन झालेल्या आहेत. त्यामुळे परदेशातून मोठ्या प्रमाणात निधी मिळू लागला आहे. एन. जी. ओ. ना उदार हस्ते देणग्या देऊन साम्राज्यवाद्यांनी भारतीय समाजात असलेल्या परिवर्तनवादी व डाव्या चळवळीत फूट पाडणे किंवा त्या कमकुवत करण्याचे षडयंत्र रचले आहे. भारतातील एन.जी.ओ. च्या अर्ध्वयू म्हणून रजनी कोठारीला ओळखले जाते. रजनी कोठारी, अरुण घोष इ. समर्थकांनी एन. जी. ओ. ना सैद्धांतिक-वैचारिक समर्थन देऊन पाळेमुळे पक्की करायला मदत केली आहे.

### ३

नव-मार्क्सवाद, उत्तर-वर्तनवाद व उत्तर-आधुनिकतावाद या वैचारिक विचारसरणीच्या आधारावर या स्वयंसेवी संघटना स्थापन होत आहेत. तसेच पाश्चात्त्य भांडवली राष्ट्रे जागतिक बँक, आंतरराष्ट्रीय नाणेनिधी यांसारख्या वित्तीय संस्थांच्या सहकार्याने जागतिकीकरणाचे प्रकल्प राबवत आहेत. हे प्रकल्प राबविण्यासाठी व त्यांना मानवी चेहरा देण्यासाठी एन.जी.ओ. महत्त्वाची भूमिका बजावत आहेत. विकसनशील देशांत या संस्था पर्यावरण, आदिवासी विकास, बचत गट, पाणलोट क्षेत्रविकास, सार्वजनिक आरोग्य, स्त्री-आरोग्य, झोपडपट्टीतील नागरिकांचा विकास, रोजगार हमी योजना, मायक्रो फायनान्स, बचतगट, शिक्षण, आपत्ती व्यवस्थापन यांसारख्या विषयावर काम करत आहेत. जागतिक स्तरावर आफ्रिका, आशिया व लॅटीन अमेरिकन देशांत कमीत कमी ५०,०००च्यां वर एन.जी.ओ. काम करत आहेत. भारतामध्येही स्वयंसेवी क्षेत्राचे जाळे विस्तारलेले आहे. स्वयंसेवी क्षेत्रातील पगारी कार्यकर्त्यांची संख्या ही केंद्रीय कर्मचाऱ्यांच्या संख्येपेक्षा जास्त आहे. आज मध्यमवर्गीय तरुण याकडे करिअर म्हणून पाहतो आहे. साचेबद्ध पक्षीय राजकारणाला कंटाळून, पक्षबाह्य राजकारण करण्याच्या हेतूने अनेकजण सामाजिक चळवळीकडून या एन.जी.ओ.कडे वळायला लागले आहेत. भारताने सातव्या पंचवार्षिक योजनेत (१९८५-९०) स्वयंसेवी क्षेत्राला अधिकृतरीत्या मान्यता दिलेली आहे. जागतिकीकरणाचे बोट धरून आलेल्या छुप्या व्यावसायिक स्वयंसेवी संस्थांना जागतिक बँक, आयएमएफ या संस्थांबरोबरच OSAID, फोर्ड फाउंडेशन, केअर ॲक्शन एड, नोविब, ख्रिश्चन एड यासारख्या अनेक वित्तीय संस्थांचे पाठबळ मिळत आहे. आज या एन.जी.ओ आपल्या समर्थनासाठी काही तात्त्विक आधार, परिभाषा उदा., उत्तर आधुनिकतेला जवळ असणारी लोकशासन सक्षमीकरण, शाश्वत विकास, वंचितभिमुखता अशी नवचळवळीची भाषा उचलत आहे. या स्वयंसेवी संस्था चळवळीत शिरून त्यांची भाषा आत्मसात करून नेतृत्वाला व कार्यकर्त्यांना आपल्यात सामावून घेत आहेत. व्यवस्था बदलाऐवजी व्यवस्थेत छोटे-छोटे बदल करत राहणे हेच त्यांचे काम झाले आहे. या स्वयंसेवी संस्था डाव्या, परिवर्तनवादी विचारांच्या विद्यार्थी, युवक चळवळीतील जे तरुण पुढाकाराने भाग घेतात अशा होतकरू युवकांना हेरून तसेच सेवानिवृत्त न्यायाधीश, मोठ्या पदावरील सेवानिवृत्त प्रशासकीय अधिकारी, मध्यमवर्गातून बहुधा एमएसडब्ल्यू किंवा तत्सम पदवी मिळविलेले तरुण, आजकाल वैद्यकीय, अभियांत्रिकी, आयटी इ. क्षेत्रातील शिक्षण परवडणारे नसल्यामुळे रिकामे असणारे तरुण या एन. जी. ओ.त काम करत आहेत किंवा त्यांना वळवले जात आहे. १९९० नंतर मात्र सरकारने एन.जी.ओ.ना अधिक उघडपणे प्रोत्साहन द्यायला सुरुवात केलेली आहे. अनेक विषय स्वयंसेवी संस्थांकडे सोपवायला सुरुवात झालेली आहे. परिणामी १९९० नंतर चळवळीतील अनेक कार्यकर्ते व नेत्यांचे मोठ्या प्रमाणात एनजीओकरण झालेले आहे. त्यामुळे सामाजिक चळवळींना ओहोटी लागलेली आहे. आर्थिक वसाहतवादी किंवा नव-भांडवलशाहीत नागरी समाज (सिव्हिल सोसायटी) संकल्पनेचा उदय झालेला आहे. लोकशाहीत नागरिकांच्या सक्रिय सहभागावर नागरी समाजाची संकल्पना आधारित आहे. शासन स्वत:ला शांतता व सुव्यवस्थेपुरते मर्यादित ठेवून नागरी समाजाच्या स्वायत्त सत्ताकेंद्रांद्वारे सामाजिक धोरणे राबवीत आहे, ही बाब आता रूढ होत चालली आहे. अशा नागरी समाजाचे आकर्षण शहरी मध्यमवर्गीय






लोकांत वाढत चालले आहे. मध्यमवर्गीय चष्म्यातून सामाजिक प्रश्न समजून घेण्याची वृत्ती वाढत चालली आहे. भांडवली सत्तेसाठी सेफ्टी व्हॉल्व्ह म्हणून एन. जी. ओ. काम करत आहेत. जनतेमध्ये तीव्र असंतोष असताना व्यवस्थाबदल होऊ नये यासाठी स्वयंसेवी संस्था सेफ्टी व्हॉल्व्ह म्हणून कार्य करतात. समाजातील क्रांतिकारी शक्यता बोथट बनवीत आहेत. परिवर्तनाचा भ्रम निर्माण करून तरुणांमधील सदिच्छेचा गैरफायदा घेऊन क्रांतिकारी चळवळीकडे येणारा तरुणांचा ओघ रोखण्याचे काम त्या करत आहेत.

एन.जी.ओ. केवळ स्थानिक प्रश्नावरच आवाज उठवितात. स्थानिक पातळीवरील चळवळींना स्थानिक वादात बंदिस्त करतात. डाव्या विचारांचा वापर करून ते लढाऊ तरुणांना आपल्याकडे खेचत आहेत. विकसनशील देशांत नवआर्थिक वसाहतवादाचा पुरस्कार करण्यासाठी ही साम्राज्यवादी राष्ट्रे पायाभूत व इतरही क्षेत्रांत गुंतवणूक करतात व सरकारवर दबाव आणतात. अमर्त्य सेन यासारख्या जागतिकीकरणाच्या कट्टर समर्थकाला नोबेल पुरस्कार देतात. हा पुरस्कार देण्यामागे या संस्थांचे षडयंत्र असते. जगभरात जेथे जेथे वर्गसंघर्ष तीव्र बनला आणि त्याची व्याप्ती वाढली, जिथे जिथे एन.जी.ओ. चे स्वरूप चव्हाट्यावर आलेले आहे. साम्राज्यवाद्यांचे हस्तक म्हणून त्यांचे स्वरूप उघड झालेले आहे. उदा., लॅटीन, अमेरिकेत, मध्यपूर्व आशिया इत्यादी जागतिकीकरणाच्या युगात साम्राज्यवादी राष्ट्रांचे हितसंबंध जोपासण्याचे काम या संस्था करत आहेत. तसेच गरीब देशांच्या शोषणातून मिळवलेल्या मोठ्या लुटीतील अत्यंत छोटा हिस्सा सामाजिक सुधारणा व विकास कार्यक्रमात वापरून उग्र होणारे विरोध शांत करण्याची भूमिका सेफ्टि व्हॉल्व्हप्रमाणे या एन.जी.ओ. पार पाडत आहेत. खासगीकरण व साम्राज्यवादी कारवायांच्या विरोधात नकली विरोध संघटित करून क्रांतिकारी आंदोलनास संभ्रमित केले जात आहे. भांडवलाकरिता स्वस्तात श्रमशक्ती आणि बौद्धिक शक्ती उपलब्ध करून देणे, वर्गअंतर्विरोध धूसर करणे, वर्गसंघर्ष विस्कळीत करणे याशिवाय साम्राज्यवादी देशांकरिता बौद्धिक हेरगिरीची भूमिकाही पार पाडण्याचे कार्य या एन.जी.ओ. करत आहेत. एन.जी.ओ.चा मूळ उद्देश हा साम्राज्यवादाचे संरक्षण आणि निरनिराळ्या मार्गांनी क्रांती संघटित होण्याच्या प्रतिक्रियेत अडथळा आणणे हाच आहे. त्यामुळे बेरोजगार युवकांनी कोणतेही काम करावे, पण एन.जी.ओ.त काम करू नये; कारण काम करणे म्हणजे चळवळीला संपवण्याचे काम करणे होय.

४

एन.जी.ओ.त दलित, आदिवासीच्या प्रश्नांविषयी खूप चर्चा होताना दिसत आहे. भारतातही दलित आंदोलन आणि स्त्री-मुक्ती आंदोलन यांवर एन.जी.ओ.ने विशेष जोर देण्यास सुरुवात केलेली आहे. एन.जी.ओ.चे दलित समस्यांविषयीचे वाढते आकर्षण हा एक चिंतेचा विषय बनत चाललेला आहे. ज्या परिसरात गरिबी, लाचारी जास्त आहे आणि त्यामुळे लोक असंतोषित होऊन प्रचलित व्यवस्थेविरुद्ध संघर्ष करण्याच्या परिस्थितीत आधिक्याने आहेत, त्याच परिसरात एन.जी.ओ. मोठ्या प्रमाणात काम करत आहेत. उदा., विदर्भातील आदिवासी, कुपोषण, मागास भाग इ. क्षेत्रात. एन.जी.ओ. परिवर्तनाच्या लढाईत गंभीरपणे असणाऱ्या संघटनांसाठी नवीन भर्तीच्या शक्यता कमी करण्याचे कार्य करतात. त्यामुळे परिवर्तनवादी संघटनांसाठी नवीन कार्यकर्ते जमवणे एन.जी.ओ.च्या अशा घातक कारवायांमुळे कठीण होऊन बसते. जागतिकीकरणाच्या प्रक्रियेत सेझ, कार्गोहब, मॉल शॉप इ. लागू करण्याच्या प्रयत्नात असताना जे दलित, आदिवासी विस्थापित होणार आहेत. त्यांवरचे लक्ष विचलित करण्यासाठी एन.जी.ओ. पुढे येतात.

एन.जी.ओ. ना जर सर्वांत मोठा धोका कोणापासून आहे असे वाटते तर ते म्हणजे विद्रोही, परिवर्तनवादी व डाव्या विचारापासून. कारण फक्त परिवर्तनवादी विचारांतच पर्यायी व्यवस्था निर्माण करण्याची ताकद आहे. तेव्हा डाव्यांचा प्रमुख आधार हा मागास, आदिवासी, दलित, कामगार, वंचित, कष्टकरी, महिला, विस्थापित इ. आहेत. म्हणून तर एन.जी.ओ. दलित प्रश्नांवर सर्वाधिक जोर देतात. त्यासाठी हे डाव्यांच्या शक्तीचे नाकर्तेपण दाखवण्याचा प्रयत्न करतात. जातीचा प्रश्न लोंबकळत ठेवणे हीच डाव्यांची नीती राहिलेली आहे असे आक्षेप घेतले जातात. लोकांना चुकीच्या दिशेने नेण्यासाठी या

आक्षेपाचा ते एक प्रकारे हत्यारासारखा वापर करीत असतात. एन.जी.ओ. आपल्या कार्याचे कार्यक्षेत्र जाणून-बुजून निवडतात. उदा., ग्रामीण गरीब शेतमजूर, दलित, शहरी, झोपडपट्टीवासी, असंघटित कामगार, महिला हे घटक निवडले जातात.

थोडक्यात, वरील विवेचनाचे सार पाहता एन.जी.ओ. किंवा बिगर राजकीय संघटना ह्या साम्राज्यवादी, नव–आर्थिक वसाहतवादी, विकसित राष्ट्रे, जागतिक वित्तीय संस्था, बहुराष्ट्रीय कंपन्या यांनी आपल्या आर्थिक हित-संबंधासाठी विकसनशील देशांत सोडलेल्या हस्तक आहेत. जागतिकीकरणाचे बोट धरून प्रवेश केलेल्या या स्वयंसेवी संस्था परिवर्तनवादी चळवळीला नेस्तनाबूत करून प्रस्थापित व्यवस्थेविरोधातला असंतोष कमी करण्याचे कार्य करत असतात. नव–उदारवादी भांडवलशाही व लोकशाहीच्या आडून या संघटनेच्या माध्यमातून जागतिक बाजारातील आपले वर्चस्व कायम ठेवण्यासाठी विकसन-शील देशांतील विरोधी सूर, विद्रोही चळवळी-आंदोलने व डाव्या विचारधारेला संपवण्याचे कार्य एन.जी.ओ. करत आहेत. तेव्हा या अंतर्गत किंवा छुप्या हेतूने प्रवेश करणाऱ्या या षडयंत्री एन.जी.ओ. पासून सर्वांनी सावध असले पाहिजे. या संस्था केवळ विकासाचा व परि-वर्तनाचा भ्रम निर्माण करण्यासाठी पर्यावरण, बालमजुरी, मानवी हक्क, स्त्रीसबलीकरण इ. प्रश्नांचा कळवळा असलेले विषय घेऊन विकसनशील राष्ट्रांत प्रवेश करून आपला व्यापारी व बाजारपेठीय स्वार्थ साधण्याचे षडयंत्र पार पाडत असतात.

**संदर्भ :**

१. NGOचा सुळसुळाट : भीमराव बनसोड, सुगावा प्रकाशन, पुणे, १ जानेवारी २०१०.
२. एनजीओचे पीजीओमध्ये रूपांतर होत आहे : दिनानाथ मनोहर, परिवर्तनाचा वाटसरू, अंक १-१ ते १५ सप्टें. २०११.
३. स्वयंसेवी क्षेत्राची चळवळ : जाधव विवेक, १ मे २००८.
४. भांडवलशाहीच्या बदलत्या दिशा आणि पुरोगामी जबाबदाऱ्या : राम बापट, संपा. किशोर बेडकिहाळ विचारवेध संमेलन अध्यक्षीय, भाषण खंड – १.

☆☆☆

# 'भूमीचे मार्दव' – सृजनाचे वैभव

प्राचार्य डॉ. पंडितराव पवार

प्रा. इंद्रजित भालेराव हे आजचे आघाडीचे आणि रसिकमान्य कवी आहेत. यापूर्वी त्यांचे शेतीमाती, शेतकरी जीवनाच्या व्यथा, स्त्रीजीवनांच्या वेदना आणि गाव-शिवाराला बोलते करणाऱ्या आशयघन आणि सहवेदना व्यक्त करणाऱ्या कविता लिहिल्या. आपल्या कवितेतील आशय रसिकांपर्यंत काव्यवाचनाच्या माध्यमातून पोचविण्याचाही प्रयत्न एक संवेदनशील कवी म्हणून केला आहे. वेळोवेळी आपल्या काव्यलेखनाच्या प्रेरणा आणि भूमिकाही त्यांनी प्रसंगोपात्त मांडल्या आहेत. त्यातून त्यांची लेखनपूर्व आणि लेखनगर्भ आत्मनिष्ठा प्रकट झाली आहे. 'पीकपाणी', 'आम्ही काबाडाचे धनी', 'पेरा', 'टाहो' यांसारखी त्यांच्या कवितासंग्रहांची शीर्षके पाहिली म्हणजे शेतकरी आणि त्यांची जीवनसामग्री – त्यातून घडणारा संघर्ष, शेतकऱ्याचे आणि स्त्रियांचे दर्दभरी प्राक्तन यांचेच या कवितांतून दर्शन घडते. निसर्गाने साथ दिलीच तर शीतल-सुखद चांदण्याचा शिडकावाही कधी कधी या कवितांमधून होतो.

खरेतर, माती हा अनेक कवींचा जिव्हाळ्याचा आणि सनातन काव्यविषय झालेला आहे. माती हे सृजनाचे प्रतीक असून मानवी जीवनाशी मातीचे घट्ट नाते जोडले गेले आहे. मातीतून येणे आणि मातीत एकरूप होणे हा तर प्रत्येक सजीवाचा धर्मच आहे. शेवटी 'मातीवर चढणे एक नव थर अंती' हाच जीवनाचा एक अर्थ होय. 'मातीचे गायन', 'मृण्मया'चा साक्षात्कार, 'मातीची दर्पोक्ती' अशा आशयाच्या कविता मराठी कविताजगतात अक्षर झाल्या आहेत. या मातीतील 'हिरवे हिरवे गार गालीचे हरित तृणाच्या मखमालीचे' अशी दृश्ये कवीला मोह घालतात. पहिल्या पावसाने मातीतून येणाऱ्या सुगंधी अत्तराचा सुगंध घमघमतो. याच मातीतून 'पाने टरारून' येतात. त्या पहिल्या हिरव्या तृणपात्यांचे कवी स्वागत आणि 'सत्कार' करतो. अशा या चैतन्यमयी सृजनाचे कौतुक पाहून एखादा कवी म्हणून जातो, "ह्या नभाने ह्या भुईला दान द्यावे। आणि ह्या मातीतुनी चैतन्य गावे." याप्रमाणे निसर्ग-मातीचे विषय कवींना भुरळ घालताना दिसतात. या काव्यविषयांतून कवी आपल्या भाव-भावना आणि आपल्या रोमारोमांत भिनलेले काही जीवनागामी अनुभव साकार करीत जातो.

कधी कधी एखादा कवी विशिष्ट अशा एकाच विषयावर आपले समग्र अनुभव व्यक्त करतो. त्यातून त्याच्या जीवनाची समग्रता साकार होते. हे अनुभव व्यक्त करताना कदाचित कुठे कुठे उत्कटता कमी पडू शकते. परंतु अशा एखाद्या विषयाच्या आविष्करणात कवी स्वतःला झोकून देताना दिसतो. त्या विशिष्ट विषयाचे अनेक कंगोरे तो सूक्ष्म छटांसह मांडत जातो. त्यातून मानवी जीवनाचे ईप्सित, तत्त्वज्ञान आणि निसर्गाशी असणारे चिरंतन नातेही तो सहजपणे सांगत जातो. आपल्या रामायण, महाभारत यांसारख्या आर्ष महाकाव्यांतील मिथकेही विविध पातळ्यांवर नवे अर्थ सांगून जातात. त्या दृष्टीने प्रा. इंद्रजित भालेराव यांच्या 'भूमीचे मार्दव' या अलीकडच्या काव्यसंग्रहाकडे पाहिले पाहिजे. त्यांच्या या कवितासंग्रहात पिकांची आणि गवताची विविध काही रूपे काव्यात्म पातळीवर व्यक्त झाली आहेत. या कवितासंग्रहाच्या प्रस्तावनेत सुप्रसिद्ध साहित्यिक वसंत आबाजी डहाके म्हणतात," 'मातीचे मार्दव' या संग्रहातल्या गवताच्या कविता तर खासच आहेत. त्यात गवताचे सौंदर्य आहे आणि भाषेचेही. या कविता गवताविषयीच्या आहेत आणि माणसाविषयीच्याही आहेत." या विधानांतून गवत आणि माणूस यांच्या सनातन संबंधाबरोबरच गवताशी निगडित भाषेचाही संबंध सूचित होतो. माती आणि सृजन हेच या कवितासंग्रहाचे आशयकेंद्र झालेले आहे. अशाच प्रकारे कपाशीचे किंवा पऱ्हाटीचे झाड, त्याचे सृजन आणि त्याची विविध रूपे काव्यगत करण्याचे कौशल्य ज्येष्ठ कवी विठ्ठल वाघ यांनी 'कपाशीची चंद्रफुले' या काव्यसंग्रहातून दाखविले आहे.

'भूमीचे मार्दव' या कवितासंग्रहाच्या शीर्षकातूनही माती आणि मातीतील सृजनाचे व्यापक भावसौंदर्य आणि अर्थद्रव्य सूचित होते.

'आभाळ दऊत। पावसाची शाई
सज्ज झाली भूई। उफाणून'

या काव्यपंक्तीतील पाऊस पडणारे आभाळ आणि सृजना-साठी वाफारून सज्ज झालेली भूमी हे नवसृजन सुचविणे हे अर्थव्यूह आहेत. शेतीमातीतील पीकपाण्यात श्रीविठ्ठलाची विविध रूपे पाहणाऱ्या पहिल्या शेतकरी कवी सावता माळी यास या कविता अर्पण केल्या आहेत. त्यातून कवीची शेतकऱ्याशी असलेली जवळीकच स्पष्ट होते. 'भूमीचे मार्दव सांधे कोंभाची लवलव' या संत ज्ञानेश्वरांच्या उक्तीतील मातीच्या सात्त्विक गुणाचे लावण्य आणि मार्दव हे रोपट्याच्या रूपात प्रकट होते. याच न्यायाने इंद्रजित भालेराव यांच्या वृत्तीतील सात्त्विकता आणि मनाची कोवळीकता त्यांच्या या ९६ कवितांतून विविध रूपांनी अनुभवावयास येते. संत ज्ञानेश्वर, सावता माळी यांचे ऋण आणि संदर्भ काव्यात औचित्यपूर्ण रीत्या आले आहेत. त्यावरून कवीची संतपरंपरेशी जुळलेली नाळ आणि संस्कारही स्पष्ट होतात. त्यातून कवीचा व्यासंगही प्रगटतो.

कोणत्याही हाडाच्या कवीचा जीवनविषयक दृष्टिकोण त्याच्या कवितांत प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणे पाझरत असतो. कवीच्या शारीरिक-मानसिक-बौद्धिक जाणिवांचा कलात्मक आविष्कार म्हणजे त्याची कविता असते. कवीचा समग्र जीवनानुभव, सभोवतालच्या निसर्गातील सृजन, त्याचे नितळ सौंदर्य आणि त्यापासून मिळणारा निखळ आनंद या सर्व घडामोडींचा संबंध कवीच्या काव्याशी येतोच येतो. आणि हा कवी जर त्या मातीत घट्ट पाय रोवून डोळसपणे वावरणारा असला, तर त्याची कविताही शब्दबंबाळ न होता 'कोंभाची लवलव' घेऊन स्वाभाविकपणे प्रकटते. त्याच्या कवितेतील शब्द सभोवतालच्या जगातून आलेला असला, त्याला लोकसंस्कृतीची डूब किंवा वारसा असला, तर त्यातून कवीच्या प्रामाणिक भावना आणि अस्सल अनुभूतीचा साक्षात्कार झाल्याशिवाय राहत नाही. कारण अशा शब्दांना एक अंगभूत सौंदर्य आणि अर्थाची वलये प्राप्त झालेली असतात. अर्थ विस्तारण्याचे सामर्थ्यही त्यात येते. कारण त्या शब्दाचे आशयद्रव्य खूपच सघन असते. म्हणून अशा समग्र अनुभवांचे प्रकटीकरण करणाऱ्या कवीचे शब्द केवळ शब्दार्थ सांगून थांबत नाहीत तर लक्षार्थ, ओलांडून व्यंजनार्थ आणि प्रतियमान अर्थ ध्वनित करतात. त्यासाठी कवीच्या अव्वल प्रतिभेला व्यासंग, जीवनानुभव घेण्याची प्रामाणिकता आणि बहुश्रुततेची जोड मिळाली तर, ती कविता म्हणजे इंद्रियगोचर अनुभव देणारी आणि म्हणून अक्षरशिल्पाचे रूप लेऊन अवतरणारी असते. आणि असा अनुभव 'भूमीचे मार्दव' या कवितासंग्रहातील प्रत्येक कवितेत येतो, हे एक निखळ सत्य आहे, असे म्हणावयास प्रत्यवाय नाही. त्यांनी उद्धृत केलेल्या,

'केळीचे दळवाडे। हळू पोकळ आवाडे
परी कळोनिया गाढे। रसाळ जैसे'

ज्ञानेश्वरीतील या ओळींच्या अर्थाचा रसाळ प्रत्यय त्यांच्या कविता देऊन जातात.

या कवितासंग्रहातील कविता चार गटांत विषयनिहाय विभागलेल्या आहेत. त्या प्रत्येक काव्यगुच्छांच्या प्रारंभी कवितेच्या आशयाच्या अनुषंगाने ज्ञानेश्वरीतील आशयघन ओव्यांचे औचित्यपूर्ण संदर्भ उद्धृत केले आहेत. पहिल्या कवितांचा गुच्छ 'केळी' संबंधात एकवटलेला असून त्यात 'केळ' झाडाचे स्वरूप, सोशीकता, केळीचे घड आणि पानाचे सांस्कृतिक स्थान व्यावहारिक अर्थासह काव्यात्म पातळीवर व्यक्त झाले आहे. कवितांचा दुसरा गुच्छ शाळू, तीळ, ऊस, पराठी, मूग, भेंडी, चवळी, गहू, हरभरा, धान अशा पिकांच्या सृजनसौंदर्याचा आवि-ष्कार करणारा आहे. तिसऱ्या गुच्छात स्त्री-जीवनाच्या विविध अवस्था आत्मनिष्ठ पातळीव्रर आविष्कृत झाल्या आहेत. पोरीच्या खेळकर जीवनापासून सासरी नांदण्यासाठी गेलेल्या आणि थकलेल्या माहेरवाशिणीचे भाव येथे व्यक्त झाले आहेत. चौथ्या आणि शेवटच्या कवितांच्या गुच्छात गवतासंबंधीची विविध रूपे आणि भाव रूपगंधासह प्रकट झाले आहेत. कवितांचे स्थूलमानाने चार भाग असले तरी, सर्वच कवितांची नाळ मातीशी जोडलेली आहे. त्यामुळे मातीचेच मार्दव या कवितांत विविध रूपांत कवीने काव्यरूपात अत्यंत सहजपणे प्रकट गेले आहे.

'केळीचा गाभा' आणि 'केळपानाची आभा' यांचे लोकसंस्कृतील स्थान असामान्यच आहे. परंतु 'केळपान। लावल्याशिवाय। पंगतीला। शोभा नाही' या पंक्तीतील लोकजीवनातील केळपानाचे पावित्र्य आणि प्रासादिकतेचे स्थान चिरंतन आहे. केळीची निगराणी राखणारा शेतकरी राब राब राबतो. आणि शेवटी 'कोण राबले शेतात। कुणी दुकान थाटले' ही जागतिकीकरणातील व्यावहारिकताही कवी सहजपणे सांगून जातो. केळीने जपलेले सासू-सुनेचे नाते, तिचा 'गरतीचा थाट', कंदातून कंद जन्माला घालण्याची सृजनशीलता, तिची सचैल अंघोळ, तिच्यात छायेत 'लोळणारे साप' आणि अनेक कासावीस जिवांचे आश्रयस्थान असणाऱ्या केळीची कितीतरी रूपे कवी केवळ कल्पनेने नव्हे, तर सूक्ष्म अशा निरीक्षणाने आणि व्यासंगाने साकार करतो. 'भूमीचे मार्दव' असे तरल आणि तितक्याच लांबट केळपानातून कवीला जाणवते. 'ऊसाच्या पानासारखे। काटे नाहीत। करडीचे पाटे नाहीत' असे केळझाडाचे विशेष सांगून मखरासाठी केळपानच हवे, हे लोकसंस्कृतीचे अंगही केळच असते. केळीच्या बनाचे आकर्षण कवी सहजपणे लोकभाषेत व्यक्त करतो.

शेतकरी आणि तो घेत असलेल्या विविध पिकांचे काव्यात्म सौंदर्य हा कवितासंग्रहाचा एक घटक आहे. गंगेच्या काठावरील मऊशार मातीतून पौषातल दव पिऊन गच्च भरलेले ज्वारीच्या कणसाचे शेत कवी नजरेसमोर उभे करतो. आणि 'जणू नेसलेली। जरी जरतार। लक्ष्मी फेरीते। शालूचा पदर' असे शेतातील भरगच्च पीक म्हणजे गृहलक्ष्मीचे आणि समृद्धीचे प्रतीक आहे. 'तीळ' या पिकाबद्दलची महती सांगतानाच,

'आम्ही भावंडांनी मिळून तीळ खाल्ला
की आईच्या तोंडात तीळ भिजायचा नाही
आम्ही तसं नाही केल्यावर मात्र
आईचा जीव तीळ तीळ तुटायचा'

अशा त्या पिकातूनच लोकभाषेच्या लकबीही तयार होतात. अन्य पिकांचे रूपसौंदर्यही कवीने नेटक्या शब्दांत मांडले आहे.

'गोड लागला म्हणून। खाऊ नये खणून' (ऊस)
'सरकीचं टरफल डोक्यावर घेऊन
उगवायचा सरकीतून कोंब' (कपाशी)
'मुगानं तर यंदा पांग फेडले' (मूग)
'खोबऱ्यासारखं खाऊन त्याला
बैलं पैलवानासारखी पुष्ट व्हायची' (गवत)
'एकेका भेंडीला लपेटून।
एकेक चवळी वाढत जायची' (चवळी)
'सोजीच्या पिठापासून बॉम्बे आट्यापर्यंत
एकच गहू पण बाबा तुझे प्रकार बहू' (गहू)

पिकांचे असे कितीतरी प्रकार त्यांच्या गुणवैशिष्ट्यांसह कवी सांगत राहतो. हरभरा तर कधी फुटाणा होऊन तोंडाला चव आणतो आणि कधी प्रसादाच्या रूपाने देवळात येतो, तर कधी दारूड्यांची रंगत वाढविणारा ठरतो. कवीचे हे नीति-अनीतीचे निरीक्षण विलक्षण बोलके आहे.

'शेत माझा ग्रंथ। पीक माझी ओवी।
यमक जुळवी। अध्यात्माशी।
आशयाची दाटी। झाली कणसात।
खळ्यामध्ये रास। खंडीखंडी'

कवीची माती–शेतीवर प्रचंड निष्ठा आहे. त्या मातीतील ग्रंथातून तो विविध पिकांच्या ओव्या साकारतो आणि त्याच्या कवितेचे नाते थेट अलौकिकाशी जोडले जाते. विविध पिकांचा काव्याशय इतका समृद्ध आहे की, कवितांच्या खळ्यात अर्थाच्या राशीच राशी उभ्या राहतात. ही भूमिका कृषिसंस्कृतीला श्रेष्ठत्व देण्याबरोबरच तिच्या समृद्धीचे महत्त्वही अबाधित करते.

कृषिवलाच्या परकरी पोरीला सोन्या-चांदीचे दागिने मिळत नसले तरी, बाभळीची फुले कानात घालून नटणारी आणि बोरीच्या वाकड्या काट्याची नथणी खोवणारी पोर हीदेखील मातीतून मिळणाऱ्या सौंदर्यात बुडून जाते. हीच पोर दिसामासांनी या मातीतच वाढून तिच्या संसारात एकरूप होते. त्या स्त्रीरूपाचे आणि सृजनाचे एक पवित्र नाते कवी जोडतो.

'आलं नहान पहिला ऋतू। माईचं दूध चाललं ऊतू' तारुण्यात पदार्पण करणाऱ्या आपल्या मुलीला निसर्गधर्म म्हणून 'न्हान' आल्यावर आईची ही स्वाभाविक प्रतिक्रिया 'दूध चाललं ऊतू' या शब्दांतून व्यक्त होते. स्त्रीच्या सृजनशीलतेचे हे स्वागतच आहे. घरातली परकरी पोर

ऋतुमती होताच घरातील बाप, भाऊ, बहिणी या सर्वांच्याच प्रतिक्रिया आनंद आणि कौतुकमिश्रित आहेत. त्यातून न्हान आलेल्या मुलीची भीती दूर करण्याचा आणि तिला स्त्रीत्व बहाल करण्याचा हा कौटुंबिक सोहळा कवीने कुशलतेने साकार केला आहे.

'तिची 'जखम सोन्याची' झाली।
ओली 'जमीन पुण्याची' झाली'

या काव्यपंक्तींतून स्त्रीचे सृजनत्व आणि तिच्या जन्माचे सार्थकच सूचित व्हावे. 'तुलाच कसा शिवतो काऊ' या काव्यपंक्तीतून लोकसंस्कृतीमधील कावळा शिवण्याचे संकेत कवी लोकभाषेच्या आधारे सूचकतेने सांगून जातो.

'कोवळ्या छातीवर कोवळे आले ओझे
कोवळ्या ओठावर लालस लाली सदा'

या काव्यपंक्तींतून यौवनावस्था आणि सौंदर्यभाव अतिशय संयत शब्दांत व्यक्त झाले आहेत. माहेरी लाडात वाढलेली पोर लग्नानंतर सासरी गेल्यावर वेगळ्या जगात एकरूप होऊ पाहते. परक्या घरातील वेगळी रीतभात समजून घेताना सुरुवातीला ते अवघडच जाते. सासूच्या खाष्ट स्वभावाची हाय खाण्यात आणि कष्टाची कामे करताना पाय पोळण्याचे अनुभव तिला जिव्हारी लागतात. डोंगरी गाव सासर म्हणून नशिबी आल्यावर तिच्यासारखी दुर्दैवी तीच अशी तिची धारणा होते. अशा दमल्याभागल्या लेकीला आई मायेने म्हणते,

'उभ्या उभ्या आडरातर येऊन जाय ग लेकी'

तेवढाच एक दिवसाचा तिला विरंगुळा मिळेल, ही आईची माया सहभावनेने व्यक्त झाली आहे. ही सहानुभूती व्यक्त करताना कवी म्हणतो,

'लेकीचा जलम लेकीला कळतो
आत आत कसा आतमा जळतो
जळतं त्यालाच लागतं कळाया'

ही सासरी नांदणाऱ्या मुलीच्या जातीची व्यथा कवीने सार्वजनिक पातळीवर व्यक्त केली आहे. कन्या हे परक्याचे धन असते हे प्रत्येक जन्मदात्यांला माहीत असते. तिचे जीवन सुखी व्हावे यासाठी त्यांचा आत्मा तीळ तीळ तुटतो. वर्षाच्या सणावाराला तरी ती माहेरी यावी, अशी मनोमन इच्छा तिच्या आईबापांची असते. कारण,

'माहेराला येते। सासुरवाशीन।
होते सुखासीन। चार दीस
पुन्हा सासरची। तुडवीत वाट।
आयुष्याचा घाट। चढायचा'

या माहेरवाशीणीला आयुष्याची जबाबदारी स्वीकारून मार्गस्थ व्हावेच लागते. 'अर्थोऽही कन्या परकीय एवम' हे वैश्विक सत्य कवीने नेटक्या शब्दांत व्यक्त केले आहे.

कवितांचा चौथा गुच्छ काहीसा मोठा आणि 'गवत' या विषयाशी निगडित आहे. 'क्षणभर तृणबाळे होऊ' असा बाल्यभाव व्यक्त करणारा आणि 'हे माझ्या गवताच्या पात्या'मधील गंभीर जीवनचिंतनाचा अनुभव मराठी कवितेत यापूर्वी प्रातिनिधिक स्वरूपात आलेला आहेच. त्याचप्रमाणे अमेरिकन कवी वॉल्ट व्हिटमन यांच्या 'Leaves of Grass' या काव्यसंग्रहातही समाजजीवन आणि निसर्ग मुक्तछंदात (Free Verse) प्रतीत झाला आहे. त्या कवितासंग्रहाचे कविवर्य सदानंद रेगे यांनी 'तृणपर्णे' या नावाने मराठीत भाषांतर केले असले तरी, यात तृणपर्णापेक्षा निसर्ग, राजकारण आणि समाजजीवनाचे मुक्त चिंतनच अधिक आहे. 'भूमीचे मार्दव'मधील गवताशी निगडित कवितांचे आणि त्यातील काही स्वैर रचनांचे मुक्तछंदाशी काहीसे साम्य दिसून येते.

'भूमीचे मार्दव' या कवितासंग्रहातील इतर विषयांवरील कवितांपेक्षा 'गवता'शी कवीचे एक प्रकारचे खोलवर नाते प्रस्थापित झाले आहे. त्यामुळे कवीने आपले वैयक्तिक भावजीवन, समाजजीवन, लोकसंस्कृती इत्यादींशी गवताचे असलेले नाते प्रकट केले आहे. किंबहुना 'गवत' हे मिथक कवीला जीवनस्पर्शी झाले आहे. या कविता-संग्रहातील कवितांसंबंधी कवीनेच आपली भूमिका अन्यत्र सांगितली आहे. जिंतूर महाविद्यालयाच्या पाठीमागे असलेल्या डोंगरावर कवी मधल्या वेळात निसर्गदृश्याच्या आस्वादासाठी बसले असता, त्यांना सभोवतालचे शेतकरी, त्यांची गुरे, पाखरे यांचे सहज दर्शन घडे. हा सगळा डोंगर म्हणजे बालघाटाच्या शेवटच्या रांगा होत. त्या रांगांना प्राचीन इतिहासही आहे. या टेकड्यांवर झाडे नाहीत, परंतु देशी गवताचे तुरे कवीला भुरळ घालून गेले. त्यातूनच काव्याचे शब्द उमटू लागले. कवीच्या

अनुक्रमणिका

शब्दांत सांगायचे तर, 'गवत आणि त्याभोवतीची आख्खी संस्कृती मला दिसू लागली. रामायण, महाभारत, गौतम-बुद्ध, महात्मा कबीर, स्वामी चक्रधर, ज्ञानेश्वर, तुकाराम या सगळ्यांना दिसलेलं गवत, शेतात राबणाऱ्या माझ्या पूर्वजांना दिसलेलं गवत आणि लहानपणापासून माझ्या डोळ्यांना दिसलेलं गवत मला आठवू लागलं. लहानपणी गुरं चारताना अनेकदा मी गवताचे कोवळे तुरे खायचो. त्यापासून बनलेलं रक्त बहुधा उसळ्या मारीत असावं' (लोकसत्ता, दि. १५ मे २०११) या मनोगतातून कवीच्या गवतासंबंधीच्या कवितांना एक प्रासंगिक निमित्त असले, तरी 'गवत' हा विषय त्यांचा समग्र जीवनव्यापी आहे. म्हणूनच त्यांच्या या कवितांचा अवकाश किंवा पैसास खूपच विस्तृत आणि सखोल आहे. बौद्ध तत्त्वज्ञान आणि महानुभाव संप्रदायातील घटनाही गवताशी त्यांना निगडित वाटतात. रामायण-महाभारताशी या कवीने गवताचे मूळ शोधले आहे; नुसते शोधले नाही तर, त्याला आपल्या काव्यात्म भाषेतून अक्षर केले आहे.

'वासरामागं पळून खूप थकलो।
की मऊसूत गवतावर लोळत राहायचो
जीव लावून गाई गवतात चरायच्या।
तेव्हा गाईंसारखं गवत खावंसं वाटायचं' (पृ. ७९)

कवीचे गवताशी असणारे सलगीचे असे नातेही कवीला काव्यभाव व्यक्त करण्यास भाग पाडीत असावे. कारण येथे आत्मप्रत्ययाची जाणीव कवीच्या आत्मनिष्ठेचा प्रत्यय आणून देणारी आहे.

'गवत। दुधासारखं पौष्टिक। दह्यासारखं घट्ट।
खरवसासारखं कठीण।
लोण्यासारखं मऊ। ताकासारखं पाचक। तुपासारखं
स्निग्ध। असतं' (पृ. ६५)

'स्वर्गातून पृथ्वीवर येताना। गाईच्या खुराला लागून
गवताचं बी पृथ्वीवर आलं। इथल्या मातीचं झालं'
(पृ. ६७)

'लव्हाळी आणि कुसळी या दोन गवतांनी
लवकुशाच्या रूपात भूमिकन्येपोटीच जन्म घेतला'
(पृ. ६८)

'जरासंधाच्या मृत्यूचे। रहस्य समजावून सांगताना
श्रीकृष्णाने। गवताची काडी मोडून दाखविली'
(पृ. ६९)

'गौतमाला साक्षात्कार झाला तेव्हा। डोक्यावर
बोधीवृक्ष होता आणि बुडाखाली गवत' (पृ. ७०)

'गवत उपटण्यापूर्वी। हात जोडून गवताची प्रार्थना
म्हणावी
आणि भूमीची क्षमा मागावी।
या उपनिषादातल्या। सुक्तांची। म्हाइमभट्टाला
आठवण करून दिली' (पृ. ७०)

'एकदा कबीराचा मुलगा कमाल। गवत कापायला
शेतात गेला
आणि गवताचे विभ्रम पहात बसला' (पृ. ७२)

'महाबलाढ्य मुगलसम्राटाला।
दाती तृण धरून शरण आणण्याची हिंमत
छत्रपतींनी बाळगली होती म्हणूनच।
गवतालाही नंतर भाले फुटलेले होते' (पृ. ७३)

कवितासंग्रहातील हे आणि यांसारखे आणखी काही संदर्भ पाहिले म्हणजे 'गवत' हा विषय संस्कृतीच्या मुळापर्यंत कसा मातीत रुजलेला आहे, हेच कवीने आपल्या प्रतिभा-बलाने आणि व्यासंगाने सांगितले आहे.

गवताची विविध रूपे सांगतानाच गवत हे जनावरां-साठी देवाने दिलेले आंदण आहे. रानलहू आणि पानलहू हे गवताचे जुळे भाऊ म्हणे लवकुशच आहेत हे रामायणात नसले तरी, कविप्रतिभेचा हा साक्षात्कार आहे. जरा-संधाच्या मृत्यूचे रहस्य श्रीकृष्णाने गवताच्या काडीच्या आधारे सांगितले, पण त्याचा मृत्यू लव्हाळ्याच्या शस्त्रांनी आणि यादवीतून झाला हे अज्ञाताचे गूढही कवी सांगून जातो. म्हाइमभट्ट इतरांना क्षुद्र समजण्यासाठी पायात गवताचे वाळे घालून फिरायचा. ते त्याचे अहंकारातून आलेले अज्ञानच होय. परंतु उपनिषदात गवताला देवा-सारखे पावित्र्य प्राप्त झालेले असल्याने ते उपटण्यापूर्वी भूमीची क्षमा मागून गवताची प्रार्थना करावी, हे श्रीचक्रधर स्वामींनी त्यास सांगितल्यावर त्याचे अज्ञान आणि अहंकार कमी झाला. गवत कापणे हे पाप आहे, हेच जणू गवत कमालला सांगते. तर औरंगजेबाची भीतीची आणि लाचारीची स्थिती गवताच्या प्रतीकातून व्यक्त होते. तेच गवत कधी भाल्याचेही रूप घेते, असा इतिहास आहे.

अशी मानवी जीवनाची रहस्ये उलगडणारी जीवनसत्ये गवताच्या मुळाशी आहेत. म्हणून या कवितेतील गवत हे लोकसंस्कृतीचे एक आधारतत्त्वच म्हटले पाहिजे, हे कवीने काव्यात्म पातळीवर सांगितले आहे. त्यासाठी लोकजीवनातील बोलीभाषाही योजून कवीने काव्याशय अधिक प्रत्ययकारी केला आहे.

'तण म्हणजे धानात उगवते ते।
गवत म्हणजे बांधावर उगवतं ते'

असा तण आणि गवतमधील फरक कवी गुणदोषांसह सांगतो. 'तण' पिकाला मारक ठरते. गवत बांधाला आधार देते. म्हणून 'तणाला' मारावे लागते, तर 'गवताला' सांभाळावे लागते, ही शेतकऱ्याची व्यावहारिक गरज कवीने स्वानुभवातून सांगितली आहे. तण अनपेक्षित ठिकाणी उगवते, तर गवत बांधावर उगवते म्हणून ते पायाखाली येते आणि जंगली गवत माणसापासून लांब उगवत असल्याने वणव्यात त्याला कुणीही वाचवू शकत नाही. येथे 'तण', 'गवत' आणि 'जंगली गवत' यांना कवीने स्वतंत्र व्यक्तिमत्त्व देऊन गवताची महतीच सूचित केली आहे.

'धान पूर्वी तनच होते। रानावनात वाढत होते
कणगीत भरून ठेवले। तनाचे धान झाले' (पृ.७६)
'धानाच्या बियाला। जपूनही वाळवी लागते
गवताच्या बियाची निसर्गालाच काळजी असते'
(पृ. ७७)

या ओळीतील निसर्गनियम, त्याचे चक्र आणि मानवी प्रयत्नाला असणाऱ्या मर्यादा कवी नेमक्या शब्दांत सूचित करतो. 'कुंधा' नावाच्या गवताच्या बदाचा चिवटपणा सांगताना कवी लिहितो,

'कुणबी लेचापेचा असेल तर।
त्याला कायमचं रानातून हटवतात'

हे चित्रण कविकल्पना नसून कवीचे वास्तवानुभव आहेत. त्याशिवाय कुंदाच्या बेचीतील 'बदा'चे चित्रण रेखाटणे अशक्य आहे. लोकजीवनातील 'ज्याच्या शेतात हरळी आणि कुंधा त्याने करून नये शेतीचा धंदा' या म्हणीतही कुंधाचा चिवटपणा आणि शेतकऱ्याचा आळसच सूचित होतो. अशा रीतीने गवत, माणूस, लोकजीवन आणि लोकसंस्कृतीचे विविध आयाम कवीने अत्यंत साध्या आणि भाववाही शब्दांत साकार केले आहेत. शेवटी या पृथ्वीवर गवतच उगवले नाही तर काय होईल? असा प्रश्नही कवी स्वतःशीच विचारून उत्तराची अपेक्षा वाचकांकडून करतो.

'अशी कल्पना करा की पृथ्वीचा गोल फिरतो आहे
आणि त्यावर मुळीच गवत उगवलेलं नाही
ही कल्पना जितकी भयानक असेल
तितके भयानक काहीच नसेल एवढे लक्षात ठेवा'
(पृ. ११३)

या कल्पनेचे उत्तर म्हणजे गवताशिवाय पृथ्वी म्हणजे निरस, रूक्ष आणि चैतन्यहीन जिणे हेच माणसाचे दुर्दैव होय. यावर थोर-थोर शास्त्रज्ञही उतारा शोधू शकतील की नाही, हा मानवी जीवनासाठी प्रश्न ठरेल. किंबहुना ही कविता म्हणजे या गुच्छातील कवितांचा निष्कर्ष म्हणता येईल.

'भूमीचे मार्दव' ही दृक्-प्रतिमा या संग्रहातील समग्र कवितांतून दृगोच्चर होते. 'लेणीमधले शिल्प', 'केळपानाची आभा', 'केळीचा गाभा', 'केळीचा घड', 'नवा पोघा', 'गरतीचा थाट', 'करडीचे पाटे', 'कुस्तीतील मस्त रग', 'कणसाचे शेत', 'शालूचा पदर', 'कोवळी कणसं', 'सोन्याचा गोफ' (गुंफल्यासारखी गव्हाची ओवी), 'कठाळ्याचा डांभा', 'मिरगाचा पुत्र', 'काळ्या मातीतील भेग', 'सोन्याची जखम', 'पुण्याची जमीन', 'उन्हाचा कहार', 'हिरवा चुडा', 'आतड्याची कात', 'मुऱ्हाळ्याचे घोडे', 'आयुष्याचा घाट', 'केवड्याचं रान' इत्यादी प्रतिमा या भूमी आणि सृजनाशी निगडित आहेत. त्या शब्दार्था-बरोबरच लक्षार्थ ओलांडून प्रतियमान अर्थ ध्वनित करतात. 'गवत दुधासारखं पौष्टिक असतं'मधील उपमाही सहजपणे येऊन जाते.

'पेरताना म्हणायचं साळ। उगवल्यावर म्हणायचं धान। कांडल्यावर म्हणायचं तांदूळ।
शिजवल्यावर म्हणायचं भात' – हा उत्कर्ष म्हणजे सार अलंकाराचे उदाहरण म्हणता येईल.

'जीव तीळ तीळ तुटणं', 'शितं पाहून जमायची भुतं', 'दाती तृण धरणे', 'गवताला भाले फुटणे' यांसारखे लोकजीवनातील वाक्प्रचार आणि वर्णांची पुनरावृत्ती अनुप्रास अलंकारासारखी पिकांच्या संदर्भात योजून लोक-

संस्कृतीही प्रवाही ठेवण्याचे काम येथे बेमालूम होते. पिकांचीही एक भाषा असते, हेच कवीला ध्वनित करायचे असावे. या भाषेतून एक अंगभूत लय कविता वाचताना साधली आहे.

प्रत्येक कविता वेगळा आशय घेऊन अवतरत असली, तरी भूमीच्या मार्दवाचीच ती शृंखला वाटत राहते. अंतर्गत लय सांभाळून व्यक्त होणाऱ्या या कविता वाचनीय आणि गेयही आहेत. त्यातील प्रासादिकताही आवेश आणि शृंगार या काव्यगुणांची उणीव भरून काढते. मुळातच प्रत्येक कविता स्वतःचे अंगभूत मार्दव घेऊन अवतरते. म्हणूनच 'भूमीचे मार्दव' लाभलेल्या या कवितांना सृजनाचे वैभव प्राप्त झाले आहे. हे सृजनाचे वैभव प्रसववेदनांसह काव्यात्म रूप घेते. म्हणूनच गवता-शिवाय नदी, गवताशिवाय पायवाट आणि गवताशिवाय पृथ्वी या कल्पना म्हणजे गवताचे आणि माणसाचे अस्तित्व शून्यवत करणाऱ्या आहेत. विविध पिके आणि गवत हे माणसाच्या जिवंतपणाचे आणि सौंदर्याचे प्रमुख गमक म्हणता येतील. या कविता कदाचित अत्यंत उत्कट नसतील, परंतु मानवी संस्कृतीच्या मिथकांना संजीवनी देणाऱ्या आहेत. वारकरी, महानुभाव, बौद्ध मतांची जपणूकही कवीने कुशलतेने साधली आहे.

'गेली माझी मईना' ही लावणीसदृश कविता वाचताना अण्णाभाऊ साठे यांच्या 'माझी मैना गावाकडे राहिली' या लावणीचे स्मरण देऊन जाते. हे कवीच्या रचनासौंदर्याचे वेगळेपणच आहे.

एकंदरीत अत्यंत प्रवाही भाषेत 'भूमीचे मार्दव' प्रासादिक शैलीत प्रकट झाले आहे. काही कवितांना ओवीछंदाची डूब आहे. काही कविता मुक्तछंदात आहेत. गद्यशैलीतही उत्कृष्ट कविता अवतरू शकते, हेही या कवितासंग्रहाचे वैशिष्ट्य आहे.

सृजनशील अशा तापत्या भूमीची पार्श्वभूमी आणि निसर्गाचा मुक्त आविष्कार सूचित करणारे मुखपृष्ठ आणि डॉ. वसंत आबाजी डहाके यांची प्रस्तावना ही या कवितासंग्रहाची भूषणे म्हटली पाहिजेत. कवितांना शीर्षक न देता अर्थगर्भ आशयाचे रहस्य कायम ठेवले आहे. कोणत्याही प्रकारची कूटरचना न करताही प्रासादिक भाषाशैलीमुळे काव्याचे सौंदर्य आकळण्यास अडचणी येत नाहीत. अत्यंत देखण्या स्वरूपातील मुद्रण आणि अक्षरमांडणी अंतर्गत सौंदर्य खुलविते. प्रकाशकांनी एवढी काळजी घेऊनही 'स्विग्ध' (स्निग्ध, पृ. ६५) आणि 'मारालेलं' (मारलेलं, पृ. ७४) असे किरकोळ मुद्रणदोष तरुणीच्या गालावरील तिळासारखे असले, तरी ते खटकतात. एकंदरीत मराठी कवितेत एका मौलिक कवितासंग्रहाची भर पडली आहे. त्याचे स्वागत भरभरून होईल, यात शंका नाही.

☆☆☆

# ‘जनलोकपालाचे आंदोलन : व्यवस्थापरिवर्तनाच्या दिशेने वाटचाल’

प्रा. माधव चोले

सर्वप्रथम स्वीडनमध्ये १८०९ मध्ये राजकीय नेते, प्रशासनातील वरिष्ठ अधिकाऱ्यांचे वाढते गैरवर्तन, प्रशासनाचा दुरुपयोग भ्रष्टाचारी कृत्याविरुद्ध जनतेच्या तक्रारींची चौकशी करून अशा कृत्यांवर नियंत्रण ठेवण्यासाठी तसेच शासन-प्रशासनात पारदर्शकता, जबाबदारपणा आणि लोकशाहीवादी करण्यासाठी ‘लोकपाल’ नावाची संस्था उदयास आली. तिलाच स्वीडनमध्ये ‘अम्बुडसमन’ असा शब्दप्रयोग आहे. या संस्थेचे महत्त्व दिवसें-दिवस वाढत गेले. अनेक युरोपियन देशांनी या संस्थेचा स्वीकार केला. त्यामुळे लोकपाल ही संस्था भ्रष्टाचार, गैरकारभार, मनमानी निर्णयाविरुद्ध उपाययोजना करण्यात लक्षणीय रीत्या यशस्वी ठरली आहे.

भारतीय संविधानाच्या भाग-४ मधील अनुच्छेद ३६ ते ५१ मध्ये राज्याची मार्गदर्शक तत्त्वे असून त्यांनुसार राज्याने कल्याणकारी राज्याची भूमिका स्वीकारली. जनतेची कल्याणकारी कामे करण्यासाठी प्रशासकीय अधिकाऱ्यांना अत्यधिक अधिकार दिल्याने प्रशासनाचे गैरवर्तन उत्तरोत्तर वाढत गेले. प्रचलित राजकीय व्यवस्थेत लोकनिर्वाचित प्रतिनिधी, पदाधिकारी आणि प्रशासकीय अधिकारी यांच्यावर नियंत्रण ठेवणारी वर्तमान साधने प्रभावी ठरत नाहीत; त्यामुळे भ्रष्टाचार, गैरकारभाराची प्रकरणे सतत वाढत आहेत. सरकारने केंद्रीय दक्षता आयोग आणि केंद्रीय गुन्हे अन्वेषण शाखा ही भ्रष्टाचार व गैर कारभारावर नियंत्रण ठेवण्यासाठी निर्माण केली. पण या संस्थेवर सरकारचे नियंत्रण असल्याने ती केंद्र शासनाच्या दबाव व प्रभावापासून स्वतंत्रपणे कार्ये करू शकत नाही. तसेच सर्वोच्च न्यायालयानेही अलीकडील काळात या दोन्ही संस्थांच्या अकार्यक्षमतेवरही ताशेरे ओढले आहेत. त्यासाठी या सर्व पार्श्वभूमीवर स्वतःची तपासयंत्रणा असणाऱ्या लोकपाल संस्थेची आवश्यकता वाढत आहे. ५ जानेवारी १९६६ रोजी श्री. के. हनुमंतैया यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन केलेल्या प्रशासकीय सुधारणा आयोगाने प्रथम केंद्र व राज्यस्तरावर मंत्री, सचिव व अन्य प्रशासकीय अधिकाऱ्यांवर देखरेख व नियंत्रण ठेवण्यासाठी लोकपाल व लोकायुक्तांची नियुक्ती करण्यात यावी अशी शिफारस केली होती. ही शिफारस लक्षात घेऊन १९६८ मध्ये पहिल्यांदा लोकसभेत लोकपाल विधेयक मांडण्यात आले. हे विधेयक राज्यसभेत प्रलंबित असताना लोकसभा विसर्जित झाली. त्यामुळे संमत होऊ शकले नाही. त्यानंतर लोकपाल हे विधेयक १९७१, १९७७, १९८५, १९८९, १९९६, १९९८, २००१, २००४, २००८ मध्ये सभागृहासमोर मांडले गेले; पण राज्यकर्त्यांच्या इच्छाशक्तीचा अभाव, बहुमत न झाल्याने तर काही वेळेस लोकसभा विसर्जित झाल्याने संमत होऊ शकले नाही मात्र २०१० मध्ये परत हे विधेयक लोकसभेत मांडण्यात आले; पण पंतप्रधानास लोकपालाच्या कक्षेत आणावे काय? लोकपालाची स्वतःची स्वतंत्र तपासयंत्रणा असावी काय? यावर मतभेद निर्माण झाल्याने संमत झाले नाही.

**मतभेदांचे मुद्दे : –**

लोकपालासंबंधी जयप्रकाश नारायण, अण्णा हजारे, अरुणा रॉय आणि सरकारने आपापले मसुदे तयार केले. सध्या जी मतभेदाची चर्चा झाली, ती मुख्यता जनलोकपाल व सरकारी लोकपाल मसुद्यातील मुद्द्यांवरून.

१) सरकार शासकीय यंत्रणेला लोकपालाच्या कक्षेत आणायला तयार नाही. कारण नेत्यांची आणि अधिकाऱ्यांची साठगाठ असते, त्यामुळे भ्रष्टाचारी प्रकरणे बाहेर येतील अशी त्यांना भीती वाटते. मात्र जनलोकपालामध्ये शासकीय व्यवस्थेतील कनिष्ठ स्तरांपासून वरिष्ठ कर्मचाऱ्यांना लोकपालाच्या कक्षेत आणले आहे. जयप्रकाश नारायण आणि अरुणा रॉयच्या मसुद्यांत कनिष्ठ कर्मचाऱ्यांसाठी वेगळे प्राधिकरण करण्याची व्यवस्था आहे.

अनुक्रमणिका

जनलोकपालामध्ये एखाद्या अधिकाऱ्याच्या भ्रष्टाचारांची तक्रार नागरिक लोकपालाकडे करू शकतो. लोकपालाने तशी चौकशी करून भ्रष्टाचार झाले हे सिद्ध झाल्यास त्यांना सजा देण्याचे अधिकार लोकपालाला असतील, अशी तरतूद आहे. मात्र सरकार हे मानायला तयार नाही. ही सर्व प्रशासन-व्यवस्था लोकपालाच्या कक्षेत आल्याशिवाय, देशातील भ्रष्टाचार कमी होणार नाही.

२) सरकार न्यायपालिकेला लोकपालाच्या कक्षेत घेण्यास विरोध करते. त्यासाठी अकांऊटीबिलीटी कायदा करू असे सांगते. जे. पी. आणि अरुणा रॉयच्या मसुद्यांतही न्यायपालिका लोकपालाच्या कक्षेत यावी त्यासाठी स्वतंत्र नियंत्रणासाठी कायदा करावा, अशी सूचना; तर जनलोकपालामध्ये फक्त न्यायपालिकेमध्ये भ्रष्टाचार झाल्याचे पुरावे पुढे आल्यास अशा वेळी फक्त न्यायपालिकेची चौकशी करण्याचे अधिकार लोकपालाला असतील. लोकपाल न्यायपालिकेतील भ्रष्टाचारांची चौकशी करून त्याचा अहवाल सर्वोच्च न्यायालयास देईल. मात्र शिक्षा करण्याचा अधिकार सर्वोच्च न्यायालयास असेल. मात्र याला सरकारचा विरोध आहे.

३) पंतप्रधानांची चौकशी लोकपालाच्या कक्षेबाहेर असेल, मात्र जनलोकपालामध्ये पंतप्रधानाच्या भ्रष्टाचारांची चौकशी करण्याचे अधिकार लोकपालांना असतील; मात्र निराधार तक्रारी रोखण्याची पुरेशी व्यवस्था असेल. जयप्रकाश नारायण, अरुणा रॉयच्या मसुद्यांत लोकपालाच्या कक्षेत पंतप्रधान असेल, अशी व्यवस्था आहे.

४) सरकार लोकपालाच्या कक्षेत लोकनिर्वाचित संसद-सदस्यांना घेण्यास तयार नाही; मात्र जनलोकपाल मसुद्यामध्ये संसदसदस्यांना लोकपालाच्या कक्षेत घेऊन त्यांच्या भ्रष्टाचाराची चौकशी करून शिक्षा करण्याचा अधिकार आहे. संसदसदस्य हे जनतेचे प्रतिनिधी असतात. त्यांची जबाबदारी आहे लोकांचे प्रश्न सोडविण्याची, पण अनेक खासदारांविरुद्ध, भ्रष्टाचारांची प्रकरणे पुढे आल्याने त्यांनाही लोकपालाच्या कक्षेत घ्यायला पाहिजे. पण सरकार या बाबतीत उदासीन आहे.

५) केंद्राप्रमाणेच राज्यस्तरावर लोकायुक्त ही स्वायत्त संस्था असावी आणि सर्व राज्यातील अधिकारी, कर्मचारी लोकायुक्ताच्या कक्षेत असतील. लोकायुक्ताला राज्य कर्मचाऱ्यांच्या गैरवर्तनाची, भ्रष्टाचाराची चौकशी करून शिक्षा देण्याचा अधिकार असावा, असे जनलोकपालामध्ये आहे. मात्र सरकारी लोकपाल मसुद्यात याचा उल्लेख नाही. ज्याप्रमाणे सर्वोच्च न्यायालय, निर्वाचन आयोग, माहिती आयोगांना स्वायत्तता आहे तशी लोकपाल, लोकायुक्ताला असली तरच भ्रष्टाचार कमी होईल. सरकारी नियंत्रण असल्यास भ्रष्टाचाराला खतपाणी मिळेल. सी. बी. आय., केंद्रीय दक्षता आयोग यांच्यावर सरकारी नियंत्रण असल्याने त्या संस्था हतबल होऊन कार्यक्षमपणे स्वतंत्र काम करू शकल्या नाहीत.

६) सरकारी लोकपालात कार्यालयीन कर्मचाऱ्यांची सनद यांचा उल्लेख नाही. जनलोकपालामध्ये कार्यालयीन कर्मचाऱ्यांची नागरी संहिता असेल. कोणत्या कर्मचाऱ्याने कोणते काम किती दिवसांत करावे याची सनद असेल. त्या अधिकाऱ्यांने ते काम त्या वेळेत न केल्यास आणि चौकशीअंती सिद्ध झाल्यास त्या अधिकाऱ्याची पगारकपात अथवा दंडात्मक कार्यवाहीची तरतूद असावी, अशी सूचना आहे. मात्र याला सरकारचा विरोध आहे.

७) एखाद्या अधिकाऱ्याचा भ्रष्टाचार सिद्ध झाल्यास त्याला पदावरून काढण्याचा अधिकार लोकपालाला असेल; मात्र सरकार म्हणते, अशा अधिकाऱ्यांना काढण्याचे अधिकार त्या विभागाच्या मंत्र्याला असतील. मात्र अधिकारी आणि मंत्री साठगाठ करून भ्रष्टाचार करीत असतील, तर अशी भ्रष्टाचाराची प्रकरणे लपविली जातील आणि मंत्री अधिकाऱ्यांना पदावरून काढणार नाहीत.

८) सरकार स्वयंसेवी संस्थांना लोकपालाच्या कक्षेत आणायला तयार आहे. मात्र सर्व शासकीय कर्मचाऱ्यांना लोकपालाच्या कक्षेत आणायला तयार नाही. जनलोकपालात शासकीय अर्थसहाय्य

मिळणाऱ्या संस्थांचा समावेश तर सरकारी मसुद्यात सर्व स्वयंसेवी संस्थांचा समावेश आहे, यावरून मतभेद आहे.

**संसदीय राजकारणाचे अपयश हेच आंदोलनाचे यश :–**

ब्रिटिश वसाहतकाळाचा एक प्रभाव म्हणून भारतात संसदीय लोकशाही प्रक्रियेला सुरुवात झाली. स्वातंत्र्यानंतर संविधानानुसार आधुनिक संसदीय लोकशाहीचा स्वीकार केला गेला. विधिमंडळ आणि कार्यकारी मंडळ परस्पर घनिष्ठ संबंधित असून कार्यपालिकेची निर्मिती विधि-मंडळातून होईल. आणि कार्यपालिका आपल्या कार्याबद्दल विधिपालिकेस जबाबदार राहील. यालाच संसदीय अथवा जबाबदार शासन पद्धती असे म्हणतात. भारताने संसदेच्या मर्यादित सार्वभौमत्व पद्धतीचा स्वीकार केला. तिचा कायदे करण्याचा अधिकार अंतिम असला तरी, संवि-धानिक चौकटीच्या बाहेरचे कायदे सर्वोच्च न्यायालय न्यायालयीन पुनर्विलोकनाच्या अधिकाराद्वारे रद्द करते. सर्वोच्च न्यायालयातील न्यायाधीश भ्रष्ट अथवा गैरवर्तन करणारे असल्यास त्यांना पदावरून काढण्यासाठी संसदेला महाभियोगाचा अधिकार आहे, जो आता सुमित्र सेनविरोधी संमत झाला. याचा अर्थ असा की, सार्वभौम सत्ता ही एका ठिकाणी निश्चित नाही, हे लक्षात घ्यावे लागेल अंतिमतः जनता सार्वभौम आहे. कारण संविधानाचा मूळ स्रोत जनताच आहे, हे आपण उद्देशपत्रिकेत स्वीकारले आहे. भारत आणि इंग्लंडमधील संसदेच्या सार्वभौम सत्तेत फरक आहे. इंग्लंडची संसद अमर्याद सार्वभौम आहे, हे तेथील नागरी समाजानेही मान्य केले आहे. कारण तिने इतिहासकाळापासून जनतेच्या तक्रारींना, प्रश्नांना योग्य दिशा दिली आहे, प्रश्न सोडविले आहेत आणि जनतेचा विश्वासही आहे. हे त्या संसदेने करून दाखविले आहे.

संसदीय लोकशाहीला चळवळी ह्या पोषक असतात. हितसंबंधी गट, दबावगट आणि समाजातील विभिन्न प्रश्नांवर निर्माण होणाऱ्या चळवळी ह्या लोकशाहीला पोषकच असतात. त्या लोकशाहीला बळकटी आणून देतात. पण संसदेच्या धोरणात्मक कार्यावर निर्माण होणाऱ्या देशव्यापी चळवळी ह्या आव्हानात्मक असतात. त्या संसदेच्या कार्यावर प्रश्न निर्माण करतात. तेच आज आपणाला जनआंदोलनाच्या निमित्ताने दिसत आहे. संसदेच्या कार्यावर जनतेचा विश्वास राहिलेला नाही मंत्र्यावर, खासदारावर जनतेचा विश्वास नाही, हे घटनात्मक संसदीय लोकशाहीला फार मोठे आव्हान निर्माण झाले आहे हे आव्हान संवादाच्या मार्गाने सोडवून संसदेवर जनतेचा विश्वास निर्माण करणे हे सरकारचे कार्य आहे. संसद ही नागरी समाजातील प्रश्न सोडविण्या-साठी असते. ती जर स्वतःला असे प्रश्न न सोडविता सार्वभौम समजू लागली, तर तिच्या सार्वभौमत्वालाही आव्हाने निर्माण होतात. तेच आज दिसते आहे. अण्णा हजारे आपल्या वक्तव्यात म्हणाले, 'संसद वांझ झालेली आहे. तिला जनतेच्या संवेदना जाणवत नाहीत.' पण संसदेची दुर्बलता ही आज दिसत असली, तरी संविधानाच्या अंमलबजावणीपासून तिच्या कार्यावर प्रश्नचिन्ह निर्माण झालेले आहेत. संविधानात्मक संसदेची भूमिका ही विधी निर्माण करणे, शासनावर देखरेख व नियंत्रण ठेवणे आणि योग्य दिशेने सरकारला प्रभावित करणेही आहे. पण व्यवहारात पंतप्रधान, मंत्रिमंडळ आणि प्रशासकीय सचिवालय हेच कोणत्याही विधेयकासंबंधी निर्णय घेत असतात. बहुसंख्य खासदारांना संसदेचे कामकाज आणि विधेयकासंबंधी माहितीही नसते. ती ते करूनही घेत नाहीत. पक्षातील काही अभिजन हे निर्णय घेत असतात. त्यामुळे संसद ही कायदे निर्माण न करता मंत्रिमंडळाने प्रस्तुत केलेल्या विधेयकास थोड्याफार प्रमाणात बदल करून संमती देणे, तसेच संसद धोरण ठरविण्याचा निर्णय न घेता, निर्माण केलेल्या धोरणाची समीक्षा करण्याची एक संस्था बनली आहे. या संदर्भात डॉ. लक्ष्मीमल्ल सिंघवी म्हणतात, 'कायदे करण्याचा अधिकार संसदेला असला तरी कायद्याचा जन्म मुळात मंत्रिमंडळात होतो आणि संसदेत त्यास केवळ औपचारिक रूप देऊन मान्यता दिली जाते. भारतीय संसद ही अशी नाकाम का झाली, याची काही कारणे आहेत.

१. गेल्या काही वर्षांत अनेक सार्वत्रिक निवडणुकांमध्ये राजकीय पक्षांनी अनेक निष्ठावंत व्यक्तींना तिकिटे दिली आहेत. मग ती व्यक्ती गुन्हेगार असो अगर कशीही असो. ही प्रथा प्रथम आय काँग्रेसने सुरू










केली. नंतर इतर राजकीय पक्षांनी केली. त्याचा परिणाम असा झाला, की अनेक गुणवत्ताहीन, गुन्हेगार व्यक्ती संसदसदस्य बनल्या अशा व्यक्तींना जनतेच्या समस्या, देशहित, आपली जबाबदारी यांची चिंता नसत्ते.

२. संसदसदस्य हे निवडणूक जिंकण्यासाठी भरपूर काळ्या पैशांचा वापर करतात आणि निवडून आल्या-नंतर पुढच्या निवडणुकीसाठी पैसा कसा कमविता येईल, याकडे लक्ष देतात. त्यामुळे संसद प्रभावी भूमिका बजावण्यात नाकाम झाली आहे.

३. बहुसंख्य सभासदांना सभागृहाचे कामकाज माहीत नसते किंवा सभागृहात काय चालले आहे, हेही माहीत नसते. ते रुचीही घेत नाहीत. एखाद्या विधेयकावर विस्ताराने चर्चाही केली जात नाही. पक्षांच्या गोंधळामध्ये वारंवार लोकसभा तहकूब केली जाते. काही खासदार तर उपस्थितच राहात नाहीत. दुसऱ्याच कामात व्यस्त राहतात.

संसदीय राजकारणाच्या अपयशामुळे या आंदोलनाला जनतेचा मोठा प्रतिसाद मिळाला. अण्णा हजारेंचे चारित्र्य, त्यांनी देशसेवेला वाहून घेतल्याने महाराष्ट्रात गेल्या अनेक वर्षांपासून अनेक उपोषणे करून आंदोलने करून सर-कारला माहितीचा अधिकार, ग्रामसभा, दफ्तर दिरंगाई, बदल्यांचा कायदा करण्यास भाग पाडले आहे. त्यामुळे चळवळीला चारित्र्यसंपन्न नेता मिळाला. गेल्या अनेक वर्षांपासून अशा नेत्यांचा चळवळीला आधार नव्हता. या जनलोकपालाच्या आंदोलनाला दडपण्यासाठी दिल्ली शहरात राहून राजकारण करणाऱ्या नेत्यांनी-ज्यांना ग्रामीण भारत काय आहे, याची जाणीव नाही अशा नेत्यांनी-वकिली भाषेत तांत्रिक, कायद्याचे मुद्दे पुढे करून अण्णांची मागणी गैरसंवैधानिक आहे, संसदेच्या सार्वभौमत्वाला धोका निर्माण करणारी आहे, असा अपप्रचार केला. मात्र संसद जरी कायदे करीत असली, तरी तिच्यावर नागरी समाजातील परिस्थितीचा प्रभाव पडत असतो. एखादा कायदा संसदेत निर्माण होत असला, तरी त्या कायद्याचा जन्म प्रथम समाजमनाच्या आवश्यकतेतून होत असतो, हे नाकारता येत नाही. त्यामुळे भ्रष्टाचारनिर्मूलनाचा प्रबळ कायदा करणे म्हणजे घटनात्मक चौकटीचा भंग करणे नाही. मुळात असा कायदा करण्याची सर्वच पक्षांची प्रबळ इच्छाशक्ती नाही, हे लक्षात आलेले आहे.

संसदीय लोकशाहीच्या बुरख्यात काँग्रेसची निरंकुशता दिसून आली. सरकारची नियत भ्रष्टाचारनिर्मूलनाची नव्हती. रामदेव बाबांचे आंदोलन तांत्रिक मुद्दे पुढे करून पोलिस कारवाई करून मोडीत काढले; पण सरकारला मीडिया आणि जनतेच्या टीकेला सामोरे जावे लागले. सध्याच्या आंदोलनातील सरकारचे वर्तन जनतेमध्ये असंतोष निर्माण करणारे होते. उदा., अण्णा हजारेंच्या आंदोलनाला परवानगी न देणे, तांत्रिक मुद्दे पुढे करून त्यात दिवसांची मर्यादा, स्पीकर न लावणे, कायदा व सुव्यवस्थेचा प्रश्न पुढे करून १४४ कलम लावणे, अण्णांचा रामदेव बाबा करू म्हणणे, मनीष तिवारीचे वक्तव्य अण्णा हजारे हे पूर्णपणे भ्रष्टाचारात बरबटलेले आहेत, कपिल सिब्बलची वकिली वक्तव्ये, अण्णांच्या उपोषणाचा हक्क हिसकावून घेणे, त्यांना अटक करणे, नंतर सोडून देणे, अण्णांच्या सर्व शर्ती मान्य करणे. अर्थात काँग्रेसने आंदोलन चिरडण्याचे जे ठरविले होते, ते फसले आणि काँग्रेसची फसगत झाली. दुसऱ्या बाजूने या सर्वांचा फायदा अण्णा हजारेंच्या आंदोलनाला झाला. शिवाय त्यांच्या सहकाऱ्यांचा आंदोलनातील चालाकपणा, हाही महत्त्वाचा ठरला, आंदोलनात कोणत्याही पक्षाचा झेंडा न राहता तिरंगा ध्वज, देशभक्ती-गीते, जनतेची भ्रष्टाचाराविरुद्धची चीड बाहेर आली. त्यामुळे चळवळीला जीवदान मिळाले आणि ते भारतीय लोकशाहीच्या भवितव्या-साठी आवश्यक ठरते.

गेल्या काही दशकांपासून विभिन्न क्षेत्रांतल्या चळवळी थंडावल्या होत्या. आता नव्या अर्थराजकीय चौकटीत निर्माण झालेल्या व्यापक प्रश्नाच्या रूपाने लोकचळवळीला जीवदान मिळाले. त्यामुळे चळवळी करू इच्छिणाऱ्यांना हुरूप आल्यासारखा वाटणार आहे. ते योग्य असेल तर चळवळीची दशा–दिशा योग्य ठेवल्यास यश मिळू शकते.

पहिला मुद्दा, सरकार भ्रष्टाचाराबद्दल गंभीर नाही. सरकारच्या मसुद्यात भ्रष्टाचारावर कठोर उपाययोजना नाही तो कमकुवत आहे. उलट, त्याच्या तुलनेत जनलोक-पाल मसुदा जो की नागरी समितीने तयार केलेला आहे,

तो वाढता भ्रष्टाचार निपटण्यास योग्य आहे. हे समाज-घटकाला पटवून देण्यात अण्णा आणि त्यांचे सहकारी यशस्वी झालेले आहेत. दुसरा मुद्दा असा की, संसदीय राजकारणात राजकीय पक्षांची भूमिका महत्त्वाची असते. पण राजकीय पक्ष हे मुक्त अर्थव्यवस्थेत ध्येयहीन होऊन प्रत्येक पक्षाची भ्रष्टाचारांची प्रकरण बाहेर पडली. त्यामुळे जनतेचा पक्षांवर विश्वास राहिला नाही. तसेच आंदोलनाच्या काळात कोणत्याही राजकीय पक्षाने लोकपाल मसुद्यातील वादग्रस्त मुद्द्यांबाबत ठोस भूमिका न घेता दुटप्पी भूमिका घेऊन फक्त सत्ताधाऱ्यांना बदनाम करण्याचा प्रयत्न केला. यावरून असे लक्षात आले की, कोणताही पक्ष या बाबतीत समर्थनीय नाही. अण्णांच्या उपवासाबद्दलही गंभीर नाही. हा संसदीय राजकारणाचा ऱ्हासच म्हणावा लागेल. शेवटी भाजपाने अण्णा हजारेंच्या मसुद्यातील मुद्द्यांना पाठिंबा दिला आणि सत्ताधाऱ्यांना धारेवर धरले. त्यामुळे पक्षाच्या या भूमिकेमुळे जनता नागरी समितीच्या पाठीशी उभी राहिली. सर्वच पक्षांची सरकारे कोणत्या ना कोणत्या राज्यात सत्तेवर आहेतच; त्यामुळे ते भ्रष्टाचाराविरुद्ध ठोस भूमिका घेत नाहीत. तिसरा मुद्दा असा, की आंदोलनाला सुरुवातीपासून इलेक्ट्रॉनिक माध्यमांनी व्यापक बनविण्याचे काम केले. त्यामुळे हे आंदोलन सर्वसामान्य जनतेपर्यंत नेण्यात उपोषणाचे, बैठकीतले निर्णय, दोन्ही पक्षांतील संवादसारख्या घडणाऱ्या घटनांची चर्चासत्रे, सर्व ताज्या घडामोडी जनतेपर्यंत पोचवून जनमानस जागृत करण्याचे काम या इलेक्ट्रॉनिक माध्यमांनी केले.

संसदीय शासनावरील लोकांचा विश्वास कमी होत चाललेला आहे, हे सुद्धा संसदीय लोकशाहीला घातक आहे. असे जर होत चालले तर लोकशाहीची अराजकाकडे वाटचाल होऊ शकते. या सर्व बाबीला देशाचे नेते आणि घाणेरडे राजकारण जबाबदार आहे. परत एकदा नेत्यांना जनतेची मने जिंकावी लागती, संसदेवर विश्वास निर्माण करावा लागेल. संसदेवर नागरी समाजाचा दबाव असावा हे पोषकच असते, पण संसदीय राजकारणाचा ऱ्हास होत गेला तर बाहेरच्या शक्ती वाढून जनमताचा रेटा वाढला तर तो शांततापूर्ण मार्गाकडून हिंसात्मक मार्गाकडे आगेकूच करू शकतो. या आंदोलनात दोष निर्माण होऊ शकतो.

**गांधीवादी मार्गच व्यवस्थापरिवर्तनासाठी प्रस्तुत**

अण्णा हजारेंनी व्यवस्थेतील, सध्या परिस्थिती नवीन अर्थराजकीय चौकटीमुळे जे प्रश्न निर्माण झाले, ते सोडविण्यासाठी गांधीवादी मार्गच स्वीकारला. त्यांनी आतापर्यंत छोटी-मोठी १५ उपोषणे केली. ही गांधीवादी मार्गातील उपोषणे कमी-अधिक प्रमाणात यशस्वीही झाली. यातील १३ उपोषणे ही महाराष्ट्रात, तर दोन राष्ट्रीय स्तरावर केली. या आंदोलनांचे खरे यश हे गांधीवादी मार्गातच आहे, हे अगदी खरे आहे. त्यामुळे प्रथम गांधीवाद काय आहे, हे लक्षात घेणे आवश्यक आहे.

गांधीवादामध्ये साधन-शुचिता महत्त्वाची असते. गांधींनी साध्य आणि साधनाला परस्परपूरक मानले असून केवळ साध्य चांगले असून जमणार नाही; तर ते प्राप्त करण्यासाठी लागणारे साधन तेवढेच चांगले असावे लागते. गांधींचे साध्य होते सत्यावर, अहिंसेवर आधारित न्यायपूर्ण समाज प्रस्थापित करणे. त्यासाठी त्यांनी सत्याग्रह, असहकार, अहिंसात्मक मार्ग सांगितले. सत्याग्रह्याने समाजपरिवर्तनासाठी अहिंसेचाच मार्ग अनुसरला पाहिजे, सत्याग्रह्याच्या कृतीत आत्मक्लेश असणे, प्रतिपक्षाच्या भूमिकेत, दृष्टिकोणात, धोरणात परिवर्तन घडवून आणणे, हे असते. मात्र यात सूडाची भावना, परस्परद्वेष नसतो, हे लक्षात घ्यायला पाहिजे. तसेच सत्याग्रह नेहमीच व्यक्तिगत स्वार्थासाठी न करता सामूहिक हितासाठी असावा, असा त्यांचा कटाक्ष होता. हे महत्त्वाचे आहे. गांधीही म्हणत की सत्याग्रह नेहमी पूर्ण अहिंसेच्याच मार्गाने करावा. त्यांनी अहिंसेला एक सामाजिक आणि राजकीय परिमाण दिले होते. अहिंसेला व्यापक अर्थ प्राप्त करून दिला होता. अहिंसा म्हणजे शब्दाने, विचाराने, कृत्याने संभवणारी दुःखापत टाळणे होय. या मार्गाने त्यांनी स्वातंत्र्य प्राप्त करून दिले. शिवाय संस्थेतील, संघटनेतील दोष निवारण करण्यासाठीही सत्याग्रह वापरता येतो. संक्षिप्त स्वरूपात हा गांधीवाद आपणास सांगता येईल.

वरील गांधीवादी चौकटीत अण्णांच्या आंदोलनाचा अभ्यास केल्यास अण्णांनी लोकपालाचे आंदोलन अहिंसेच्या मार्गाने देशभर व्यापक केले. समाजाच्या



अनुक्रमणिका

सर्वच स्तरांतील लोक अहिंसक होऊन रस्त्यावर आले आणि जनमताचा रेटा देशभरातून उपोषण, धरणे या अहिंसात्मक मार्गांनी झाला. काही किरकोळ अपवाद वगळता हिंसा आणि राष्ट्रीय संपत्तीचे नुकसान झालेले नाही. आंदोलकांनी स्वतःच स्वतःची कामे, साफसफाई जबाबदारीने वर्तन केले. त्यामुळे पोलिसांनासुद्धा हातात काठी न घेता कार्य करता आले; अगदी जनतेचे मित्र असल्यासारखे. शिवाय अण्णांचे चारित्र्य, आंदोलनातील त्यांचा संयम, घेतलेले निर्णय हेही महत्त्वाचे होते. त्यामुळे आंदोलन गांधीवादी मार्गाने यशस्वी झाले. सरकारने आंदोलन दडपून टाकण्याचा आटोकाट प्रयत्न केला; पण आंदोलन अहिंसक असल्याने सरकारला संधी मिळाली नाही. या आंदोलनाच्या काळात मतांच्या राजकारणासाठी पक्षांच्या दुटप्पी भूमिका मतांच्या राजकारणासाठी दिसून, आल्या हे मीडियाने जनतेसमोर ठेवले. त्यामुळे जनतेच्या पक्षीय संसदीय राजकारणावर, विश्वासार्हतेवर प्रश्नचिन्ह निर्माण झाले. त्यामुळे शेवटी पक्षांच्या संयुक्त बैठका, सरकारी पक्ष आणि नागरी समितीचे सदस्य यांच्यात संवादाच्या अनेक फेऱ्या होऊन वादग्रस्त तीन मुद्द्यांवर-त्यात नागरी कर्मचाऱ्यांची सनद असावी, राज्यस्तरावर लोकायुक्त नियुक्त करावा आणि कनिष्ठ कर्मचारी लोकआयुक्ताच्या नियंत्रणाखाली असावेत यावर- २७.०८.२०११ रोजी संसदेत चर्चा होऊन, काँग्रेस, भाजपा, सपा, बसपा, डावे यांनी सर्वसंमतीने लोकपालाचा प्रस्ताव संमत करून मसुदा समितीकडे पाठविला. बसपा पक्षाने काही मुद्द्यांवर ठोस भूमिका घेतली नाही. पण संसदेतील सर्वच पक्षांनी संसदेने गमाविलेला जनतेचा विश्वास परत मिळविण्यासाठी आणि संसदेला सर्वश्रेष्ठत्व प्राप्त करून देण्यासाठी रखडलेले ऐतिहासिक विधेयक संमत केले, ही एक मोठी उपलब्धी आहे. पंतप्रधानांनीही लोकांची इच्छा हीच संसदेची इच्छा असते आणि हे अण्णांनी करून दाखविले असे सूचित केले.

आंदोलनाच्या काळात अण्णांवर टीकाही झाल्या. काही टीका ह्या व्यक्तिगत स्वार्थाने झाल्या. त्यात गो. रा. खैरनार यांनी अण्णा हे भ्रष्टाचारी आहेत, ते आठवी पर्यंतचे शिक्षण घेतलेले आहेत, त्यांना ज्ञान नाही, असे म्हटले. शिवाय अण्णांचे सहकारी प्रा. दोसरडा यांनीही अण्णा भ्रष्टाचारी असून त्यांच्या सोबतचे सहकारी त्यांची दिशाभूल करतात, अशी टीका केली. अशा टीका कोणत्याही आंदोलनावर विभिन्न कारणांनी होत असतात. गांधी, आंबेडकरांच्याही आंदोलनावर झालेल्या होत्या.

आंदोलनावर आंबेडकरवादींना, ज्यांना आंबेडकर समजला नाही. त्यांनीही टीका केली. समाजात परिस्थितीनुरूप प्रश्न बदलतात. त्या प्रश्नांना एका विशिष्ट विचारधारेच्या आधारेच पाहणे आणि सोडविणे चुकीचे आहे. प्रश्न कोणता आहे, हे पाहणे गरजेचे आहे. हे न पाहताच उगीचच विरोध करणे, संविधानविरोधी आहेत, अण्णा संसदेच्या सार्वभौमत्वाला धोका निर्माण करतात, असा अपप्रचार करणे अयोग्य आहे. एखादा प्रश्न निर्माण झाला आणि तो प्रश्न समाजहितासाठी असेल, गोरगरिबांसाठी असेल तर संविधानात आपण दुरुस्त्या केलेल्या आहेत, हे पाहिलेलेच आहे. मुळातच भ्रष्टाचार निपटण्यासाठी लोकपाल नावाची स्वायत्त संस्था निर्माण करणे संविधानबाह्य नाही, हे लक्षात घ्यायला पाहिजे. २६.०८.२०११ च्या लोकमतच्या अग्रलेखात बी. व्ही. जोंधळे यांनी म्हटले, 'आंबेडकरांनी सत्याग्रहाला विरोध केला होता.' पण स्वतः आंबेडकरांनी महाडच्या चवदार तळ्याचा सत्याग्रह, काळाराम मंदिर प्रवेशासाठी सत्याग्रह केला होता. हे आपणाला माहीतच आहे. ते म्हणतात, 'आंबेडकरांनी सामाजिक, आर्थिक लोकशाही घटनात्मक संसदीय मार्गाने वास्तवात आणावी हे खरे आहे. पण समाजातील सर्वसामान्यांच्या जिव्हाळ्याचे प्रश्न संसद घटनात्मक मार्गाने सोडविण्यास उदासीन असल्यास जनतेने निमूटपणे अन्याय सहन करत राहावा का? संसदीय राजकारण जनतेचे प्रश्न सोडवत नसल्यास जनतेला अहिंसात्मक सत्याग्रहाचा मार्ग उरतो. दुसरा मार्गच नसतो, हे आपणाला मान्य करावे लागते.

या आंदोलनात अण्णांनी स्वतः संयम बाळगून आंदोलन यशस्वी केले. तरी गांधीवादी मार्गाला गालबोटही लागले. कारण, गांधी कधीही आंदोलनात कोणाविषयी सूड, राग, व्यक्तिगत टीका करत नव्हते. मात्र यात सर्वच नेते भ्रष्टाचारी आहेत, चोर आहेत असे शब्द किरण बेदींनी उच्चारले होते. गांधींचा मार्ग हा हृदयपरिवर्तनाचा आहे. सूडाचा नाही, अथवा कोणाचा द्वेष

करण्याचा नाही.

या आंदोलनामुळे परत एकदा अण्णांनी गांधीवादी मार्गाला व्यापक रूप दिलेले आहे आणि लोकांमध्ये गांधीमार्गावर विश्वास निर्माण केलेला आहे, ही या आंदोलनाची सर्वांत मोठी उपलब्धी आहे. कारण येणाऱ्या काळात व्यवस्थेतील महत्त्वाचे प्रश्न या मार्गाने सोडविता येतील. शिवाय, गांधीवादी मार्गावरच सर्वच स्तरांत लोक आणि विशेषतः तरुण वर्ग सहभागी येणारे भारतीय लोकशाहीचे भवितव्य उज्ज्वल दिसते. तसेच नव अर्थ-राजकीय चौकटीतील समस्या सोडविण्यासाठी, निवडणूक, सुधारणा कायदा, भूमी अधिग्रहण कायदा, शेतकऱ्यांचे प्रश्न, आदिवासींचे प्रश्न सोडविण्यासाठी व संपूर्ण व्यवस्थेतील अनेक प्रश्न, समस्या सोडविण्यासाठी गांधी-वादी मार्गच प्रस्तुत ठरतो, हे आता परत एकदा व्यापक स्वरूपात सिद्ध झालेले आहे. यापूर्वीही स्वातंत्र्यानंतर गांधीवादी मार्गाने अनेक प्रश्न सुटलेले आहेत.

**संदर्भसूची :**


१. सरकारी लोकपाल बिल

२. जनलोकपाल बिल : bvijralegan@gmail.com., annahazare.org.

३. अवस्थी माहेश्वरी : लोकप्रशासन

४. हमारा संविधान : सुभाष काश्यप


☆☆☆

# माध्यम-साक्षरता : एक आत्यंतिक गरजेची चळवळ

डॉ. श्रीपाद भालचंद्र जोशी

वृत्तपत्रे, दूरचित्रवाहिन्या आणि तत्सम अन्य कितीतरी प्रकारच्या संप्रेषणाच्या संवाद-जनसंवाद-जनमाध्यमांच्या-बहुविध माध्यमांच्या एकात्म साधनसामग्रीच्या स्फोटाच्या व त्यातून सततच्या होणाऱ्या विविध प्रकारच्या माहितीच्या विविध प्रकाराने होणाऱ्या माऱ्याच्या, सततच्या वाऱ्याच्या, आणि वादळाच्या आणि झंझावाताच्याही आजच्या युगात आपण माहितीचे, संप्रेषण, संवादाचे, माध्यमांचे, 'व्यव-स्थापन' करण्याची बरीच नवनवी तंत्रे आत्मसात केली आहेत. त्यांचे बरेच 'व्यवसाय' केले. त्यांवर उपजिविकेच्या अनेक संधी निर्मिल्या. त्याआधारे समाजाचे, संस्कृतींचे, लोकांचे 'नियमन', 'नियंत्रण' व 'सहमतिनिर्माण'ही केले. मात्र, याच माध्यमांपासून आपल्या बचावाची, माध्यम-संसर्गापासून सुरक्षित असण्याची आणि माध्यमोद्भवित शारीरिक, मानसिक आशय-विषयजन्य अशा विविध प्रकारच्या 'रोगांपासून' सुरक्षित असण्याची अशी कोणती संरक्षक उपाययोजना वा शक्ती आपण कमावली आहे? अथवा ती कमावण्याच्या दृष्टीने काही पावले तरी टाकली आहेत? किंबहुना तसे काही करण्याची गरज आहे आणि ती भागली नाही तर आपण काही गमावतो आहोत याचे भान तरी आपल्याला खरोखर आले आहे काय? असे भान आल्याने काय घडते आणि ते नसले तर काय बिघडते? असे प्रश्न तरी आपल्याला पडतात काय?

ज्यांना ते पडत असतील व ज्यांना ते अजिबात पडत नसतील अशा लोकांची, लोकसंख्येची या आधारावर एक विभागणी करून बघितले, तर ज्यांना हे अथवा असे प्रश्न पडत असतील त्यांची ती 'माध्यम-साक्षर' होण्याची सुरुवात तरी आहे, असे म्हणता येईल. अशी लोकसंख्या वाढती असली तरी जगभरच अद्यापही तुलनेने नगण्यच आहे. याउलट, माध्यमांच्या विश्वानेच पूर्णपणे झपाटलेली, त्यातच बुडालेली व माध्यमांचे आणि आपले वेगळेपणच न जाणवणारी लोकसंख्याच प्रचंड मोठी आहे. नॉम चॉम्स्कीने म्हटल्याप्रमाणे, "माशाला जसे त्याच्यापासून समुद्राचे वेगळेपण जाणवत नाही" (व तो जसा स्वेच्छापूर्वक आनंदाने त्यात विहरतो, क्रीडा करतो, झोप घेतो, सारे व्यवहार करतो), त्याचप्रमाणे संवाद-माध्यमांच्या या सागरात माणसालाही या माध्यमांपासूनचे आपले वेगळेपण जाणवू नये एवढी ती त्याच्या अंगवळणी पडली आहेत. ती त्याची व तो त्यांचा भागच झाले आहेत. हे असे वेगळेपण न जाणवणारी, हे प्रश्नच न पडणारी प्रेक्षकांची, दर्शकांची म्हणण्यापेक्षाही बघ्यांची जगभरची प्रचंड लोकसंख्या, मग ती शिक्षितांची असो वा उच्च शिक्षितांची अथवा उच्चविद्याविभूषितांची, व्याव-सायिकांची वा विविध तज्ज्ञांची, ही लोकसंख्या म्हणजे 'माध्यम-साक्षर' नसलेले लोक.

जगभरच अशी 'माध्यम-निरक्षरता' ही फार मोठ्या प्रमाणावर आहे. 'संगणक-साक्षरता' अथवा संवाद-माध्यमांच्या तंत्राबाबतची, त्याच्या व्यावसायिक वापरा-बाबतची साक्षरता व कौशल्ये अवगत असणे म्हणजेही माध्यम-साक्षरता नव्हे. या दृष्टीने संवाद-माध्यमांचे खुद्द सारेच शिक्षक, प्रशिक्षक वा व्यावसायिक देखील 'माध्यम-साक्षर' असतीलच वा असतात असे नव्हे.

सुमारे चाळीस-पन्नास वर्षांपूर्वी या जगाची विभागणी ही संवाद-माध्यमांच्या नवनवीन तंत्रज्ञानामुळे झालेल्या माहितीच्या स्फोटामुळे 'माहिती-समृद्ध' 'माहिती-दरिद्री' अशी झालेली होती. 'माहिती-दरिद्री' असणाऱ्या जगातील खंड-उपखंडातील जनतेला 'माहिती-समृद्ध' करण्यासाठी जागतिक पातळीवर युनो-युनेस्को यांच्यामार्फत तेव्हाचे 'पहिले जग', 'विकसित जग', माध्यम-तंत्रज्ञान समृद्ध जग पुढाकार घेत होते. 'टेक्नॉलॉजी ट्रान्सफर', 'तंत्रज्ञानाचे हस्तांतरण' या नावाखाली नवस्वतंत्र वसाहती राष्ट्रांना ते तंत्रज्ञान पहिले जग 'पुरवत', म्हणजे विकत होते. माहिती-संवादाच्या क्षेत्रातल्या त्यांच्या बहुराष्ट्रीय कंपन्यांच्या मार्फत माहिती-संवादाचे, त्याच्या तंत्रज्ञानाचे 'सॉफ्टवेअर' म्हणजे प्रत्यक्ष निर्मित कार्यक्रम किंवा माध्यमांसाठी

अनुक्रमणिका






कार्यक्रम निर्मितीचे विशेष ज्ञान आणि 'हार्डवेअर' म्हणजे त्या माध्यमांचे तंत्रज्ञान व तंत्रसामग्री तिसऱ्या जगाला, विशेषतः आशिया खंडातील राष्ट्रांना हस्तांतरित करण्याचा मोठाच उद्योग त्यातून निर्माण केला गेला. पुढे त्यासाठीच आंतर-सांस्कृतिक संवादाची गरज निर्माण केली गेली व त्यातून पुढे संवाद-माध्यम उद्योगातील बहुराष्ट्रीय कंपन्यांचे व त्यांच्या वृत्त, माहिती व मनोरंजनाच्या उद्योगांचे जाळे आशिया खंडात विणले गेले. ते विणण्यासाठी 'नवी जागतिक माहिती व संवाद व्यवस्था', मॅक ब्राईड कमिशन नेमून युनेस्कोच्या पातळीवर आकारास आणली गेली. जगाच्या माहिती व संवादाची नव्याने 'व्यवस्था' लावण्याचा हा उद्योग सुरू असतानाच जागतिक पातळीवर 'नवी जागतिक अर्थव्यवस्था' देखील आकार घेत होती, जिचे आपल्यासमोर उदारीकरण, जागतिकीकरण, मुक्त बाजारपेठ हे स्वरूप आज उभे आहे. सारे जग हा बाजार करून सोडणे, साऱ्या जगात पहिल्या संपन्न, समृद्ध राष्ट्रांतील उद्योग जगतातल्या बहुराष्ट्रीय कंपन्यांना मुक्त संचार करण्यासाठी वातावरण तयार करणे हा मुळात 'नवी जागतिक माहिती व संवाद व्यवस्था' आकारास आणण्याचा व त्या योगे राष्ट्रवादी सरकारांच्या नियंत्रणाखाली असणारी संवाद-जनसंवादाची जन माध्यमे ही 'माहितीच्या मुक्त प्रवाहाच्या' 'लोकांच्या अभिव्यक्ती स्वातंत्र्याच्या' नावावर 'लोकांच्या' हाती सोपवण्याचा विचार जगभर प्रसृत केला गेला. या विचारापोटी सत्तरीच्या दशकात सर्वच राष्ट्रवादी सरकारांच्या हातून जनमाध्यमे काढून ती 'लोकांच्या' हाती सोपवण्यासाठीचे अभिव्यक्ती स्वातंत्र्याचे लढे उभे झाले. लोकांनीही ते प्राणपणाने लढले, त्यासाठी चळवळी झाल्या. तुरुंगवास घडले. सत्तापरिवर्तने झाली. मात्र त्या साऱ्याच्या मुळाशी असणाऱ्या प्रेरणा ह्या सारे जग हे समृद्ध राष्ट्रांतल्या बहुराष्ट्रीय कंपन्या व धाडशी भांडवलदारांच्या उद्योगांसाठी मोकळे, मुक्त करून घेणे व त्यांना हवे असलेल्या वृत्तिप्रवृत्तीचे–विचारांचे–मूल्यांचे जग निर्माण करणे ह्याच होत्या. जगातील राष्ट्रवादी समाजांचे रूपांतर हे बघता बघता आंतरराष्ट्रीय मुक्त बाजारपेठेच्या ग्राहकांमध्ये व नागरिकांचे रूपांतर हे उपभोक्त्यांमध्ये करण्यासाठी माहिती व संवादाची ही नवी व्यवस्था जागतिक पातळीवर कामी आली, आणली गेली.

आजचे जग हे जनमाध्यमातील व विविध माध्यमांमधील माहिती व मनोरंजनातून संवादाचा 'निर्मित', 'नियंत्रित', 'संस्कारित' व प्रसृत असा 'आशय' जो मूलतः व अंतिमतः कारखानदार, जाहिरातदार, उत्पादक, भांडवलदार यांच्या हिताचे जग निर्माण करण्यास बांधलेला आहे. त्याने संस्कारित केलेले जग आहे. जीवनाचे सारे अग्रक्रमच त्यांच्या 'अजेंड्याला' बांधले गेले आहेत. आजचे हे संवाद-माध्यम निर्मित 'सिम्युलेटेड', 'मॅन्युफॅक्चर्ड', 'कृत्रिमरीत्या निर्मित' सहमती निर्माण करवून घेण्याच्या, वृत्तीत बदल घडवून आणण्याच्या व आपआपल्या 'ब्रँड' पुरतीच 'लॉयल्टी', निष्ठा निर्माण करवून घेण्याच्या तंत्रज्ञानावर आधारलेले जग हे मानवी कल्याणाच्या उद्दिष्टांना बांधलेले नसून त्यापासून दूर गेलेले जग आहे.

वास्तव, सामाजिक वास्तव आणि आभासी वास्तव यांतला फरक अशा रीतीने उमगणे, तो उमजायला मदत करणे हे माध्यम-साक्षर होण्याचे लक्षण आहे.

आज स्वयंपाकाचा गॅस, डिझेल, पेट्रोल, रॉकेल, अन्नधान्य, बी-बियाणे अशा जीवनावश्यक व मूलभूत गरजा असलेल्या वस्तूंवरील सामाजिक नियंत्रणे व 'सबसिडी' हटवून ती निर्मितिमूल्याच्यावर भरपूर नफा घेऊन पूर्ण दरात विकणारी अर्थव्यवस्था खुल्या बाजाराला हवी आहे. मात्र दुसरीकडे संवाद-माध्यमांची नवतंत्रज्ञाने, माध्यमे, वृत्तवाहिन्या, वृत्तपत्रे, मनोरंजन-वाहिन्या यांवर मोठ्या प्रमाणावर 'सबसिडी' उपलब्ध असून सारी माहिती, मनोरंजन, वृत्त हे सारेच काही काळ जवळजवळ निःशुल्कच उपलब्ध करून दिले जाते.

आपल्या घरी येणारे रोजचे वर्तमानपत्र जितक्या पृष्ठांचे, रंगीत, आकर्षक छपाईसह, गुळगुळीत कागदावरील पुरवण्यांसह ज्या तीन रुपये एवढ्या 'सबसिडाइज्ड', अत्यल्प किंमतीत प्राप्त होते, तेवढ्या किंमतीत तर त्याच दर्जाचा तेवढा कोरा कागददेखील बाजारात उपलब्ध होत नाही. केबलच्या ज्या शुल्कात दोन-चारशे वाहिन्या घरबसल्या आपण बघतो, त्या साऱ्यांचे खरोखरच निर्मितिमूल्य देऊन ते बघावे लागेल, विकत घ्यावे लागेल तर ते आपण बघणे, विकत घेणे ताबडतोब बंद करू. म्हणजे आपल्याला परवडणाऱ्या, जवळजवळ निःशुल्कच, घर-






पोच, घरबसल्या, 'शिजवून', झणझणीत 'फोडण्या देऊन', चविष्ट करून वाढले जाणारे वृत्त, वृत्तकथा, माहिती, संगीत, मनोरंजन, कार्यक्रम हे सारे काही आपल्या मेंदूत पोचते करण्याचे शुल्क, त्याचा खर्च हा आपल्या प्रत्येकाच्या वतीने भरणारा वर्ग हाच या संवाद-माध्यमांद्वारे काय, कसे, किती, कोणत्या स्वरूपात कोणत्या आकारात, प्रकारात, लहान-मोठे करून, गाळून, वगळून, कोणत्या वेळी, कोणत्या परिणामांसहित व कोणत्या अपेक्षित-प्रतिसादासहित पोचवायचे हे ठरवणारा व त्याचे निर्णय घेणारा वर्ग आहे. त्या वर्गाच्या कल्याणाचे-लोककल्याणाचे नव्हे-उद्दिष्ट हे माध्यम-उद्योगांचे, माध्यम-सम्राटांचे मूळ उद्दिष्ट आहे. संवाद-माध्यमे ही त्यामुळे आता लोक-कल्याणानुवर्ती उरली नसून ती माध्यम-सम्राटांच्या, माध्यम-उद्योगांच्या कल्याणानुवर्ती झालेली आहेत. या माध्यमातून चालणारी लोककल्याणानुवर्ती भासणारी, 'विरोधी' भासणारी, 'व्यवस्थेवर हल्ला करत असणारी' सारी चर्चा तेवढीच, तितकीच व तेवढ्याच मर्यादेत, तेवढ्याच चौकटीतं 'घडवली' जाते, जिथवर ती या मूळ उद्दिष्टांना नख लावत नाही, त्याच्या अंतिमतः विरोधात ती जात नाही. 'व्यवस्थेने व्यवस्थेच्या रक्षणार्थ निर्माण केलेली ही व्यवस्थांतर्गत विरोध-सहमती' ज्या व्यवस्थेंतर्गत ही माध्यमे, ह्या माध्यम-चर्चा चाललेल्या आहेत त्या व्यवस्थे-चेच रक्षण करत, तिला बळच प्रदान करत असते. ह्या माध्यम-प्रक्रियेला प्रख्यात तत्त्वज्ञ व विचारवंत नॉम चॉम्स्की ह्याने 'सिस्टिम रिएनफोर्सिंग कॅरॅक्टर', 'त्याच व्यवस्थेचेच रूप पुनःपुन्हा लादले जाणे व ते बळकट केले जाणे', असे म्हटले आहे.

संवाद-माध्यम-निर्मित हे 'कल्चर ऑफ मेक बिलिव्ह', ही कृत्रिम, 'आभासी संस्कृती', ही 'पूर्व निर्धारित रीत्या घडवून आणलेली सहमती' निर्माण करण्याची, टिकवून धरण्याची ही सारी प्रक्रिया समजून घेणे व ती समजून देण्याची सामाजिक गरज अग्रक्रमाने जाणवणे हे माध्यम-साक्षरता चळवळीचे उद्दिष्ट आहे.

घरोघरी माध्यमांचा प्रादुर्भाव होऊनही, प्रत्येक मेंदूचा व्यक्तिशः त्यांनी ताबा घेतला जाऊनही व ९० टक्के लोकसंख्या या माध्यम-संसर्गाच्या परिघात असूनही संवाद-माध्यम-शिक्षण हे प्रत्येकाला आवश्यक, सक्तीचे व प्रत्येक अभ्यासक्रमाचा भाग करण्याचे, प्रत्येक पातळीवर ते आवश्यक त्या स्वरूपात प्रदान करण्याचे कोणतेही राष्ट्रीय धोरण, कार्यक्रम वा योजना कोणत्याच पक्षाच्या कोणत्याही शासनाला कधीही आखाव्याशा वाटत नाही.

गाडगेबाबा ग्राम सफाई अभियानासारखाच अथवा 'स्कूल चले हम'च्या धर्तीवर, तंटामुक्त गावांच्या अथवा या व अशा पद्धतीने एकाच वेळी मोठी माध्यम-निरक्षर लोकसंख्या माध्यम-साक्षर होईल, अशा प्रकारची व्यापक माध्यम-साक्षरता चळवळ राबवण्याची या माध्यम-युगात नितांत गरज आहे. मात्र सत्ता कोणत्याही पक्षाची असो, ती या माध्यम-सम्राटांना, माध्यम-उद्योगांना आपल्या हिताची असण्यासाठी 'अर्थ' पुरवठा करणाऱ्या नियंत्रक शक्तींच्याच इशाऱ्यावर आज आणली वा घालवली जाते.

या पद्धतीने शिक्षणाची, अभ्यासक्रमाची, मोहिमांची रचनाच करण्याचा विचारही कोणत्याच पक्षांच्या, राज्य-कर्त्यांच्या मनाला कधीच त्यामुळे शिवणार नाही. कारण राज्यसत्ता ही आज ज्या बाजारांच्या हिताच्या हातात हात घालूनच मिळवता येणे शक्य आहे त्या बाजारवादाच्या, माध्यम-साक्षरता चळवळ ही विरोधात जाणारी आहे.

ज्या दक्षिण कोरियाचे उदाहरण २०-२५ वर्षांपूर्वी खुल्या बाजारवादी व नव्या जागतिक संवाद-माहिती व्यवस्थेने संवादाचे नवतंत्रज्ञान हस्तांतरित करून झाल्या-नंतर निर्माण झालेल्या आर्थिक दृष्ट्या वेगवान 'मुक्त', 'समृद्ध' समाजाचे उदाहरण म्हणून दिले जात होते, त्या दक्षिण कोरियात माध्यम-साक्षरता चळवळीचा असा विचारच करून बघण्याचे टाळले गेल्याचा काय परिणाम झाला आहे, तो तपासून बघितला पाहिजे. वास्तव, सामाजिक वास्तव, मानवी-आंतरक्रिया, परस्परसंबंध यांपासून दुरावलेल्या आणि 'अतिव्यक्तिगत' अशा, स्वतः-पुरत्या निर्मित आभासी वास्तवाच्या, व्हिडिओ गेम्स व तत्सम तंत्रज्ञानाधारे पूर्णपणे आहारी गेलेल्या एका पिढीला त्या 'ॲडिक्शन' मधून बाहेर काढण्यासाठी दक्षिण कोरियाला राष्ट्रीय अंदाजपत्रकात प्रचंड मोठी आर्थिक तरतूद करून व्यापक कार्यक्रमच हाती घ्यावा लागला.

माध्यम-साक्षरतेची चळवळ न उभारता, समाजाला माध्यम-साक्षर करण्याचे टाळून माध्यमांचा केवळ माध्यम उद्योगांच्या हिताला पोषक असाच वापर करणाऱ्या शिक्षण-

प्रशिक्षणाची राष्ट्रीय व्यवस्था हेच त्याचे खरे व मूळ कारण होय.

भारतासारख्या राष्ट्रावर ही वेळ येण्याअगोदरच 'माध्यम-साक्षरता' म्हणजे नेमके काय व माध्यम-उद्योगांच्या संसर्गापासून समाजाला माध्यम-साक्षरता ही सुरक्षित राखू शकण्याची साधनसामग्री म्हणून कशी उपयोगी आणली जाऊ शकते, या दृष्टीने उद्‌बोधन केले जाऊ शकते. या दृष्टीने उद्‌बोधन-प्रबोधनाची चळवळ वेळीच उभारली जाण्याची गरज आहे.

राज्यकर्ते, धोरणकर्ते, शैक्षणिक धोरण ठरवणारे, अमलात आणणारे ते करोत न करोत, पण एकीकडे त्यासाठी त्यांच्यावर दबाव वाढवणे आणि दुसरीकडे स्वयंसेवी संस्था व गट त्याकरता स्थापून व अस्तित्वात असलेल्या सामाजिक व सेवाभावी संस्था-संघटनांच्या-मार्फत त्यांच्या सहकार्यानेदेखील हे केले जाऊ शकते.

'टर्न ऑफ टी व्ही, टर्न ऑफ लाइफ' नावाची कॅनडा, अमेरिका, इंग्लंड, फ्रांस, युरोपात दोन कोटी सदस्य नोंदवलेली अशीच एक चळवळ गेली काही वर्षे जोमाने काम करते आहे. तिची स्वतःची वेब साइटही आहे. तिला भेट देऊन त्यांचे कार्य जाणून घेतले पाहिजे. याशिवाय माध्यम-साक्षरतेचा प्रसार-प्रचार करणाऱ्या अनेक संस्था, उपक्रम, अभ्यासक्रम गट व चळवळी जगभर उभ्या होत आहेत. त्यांच्या संपर्कात राहून संवाद-माध्यमांच्या एकूणच विश्वाने माणसाचे जे काय केले आहे ते व काय करायला हवे ते, याबाबतची सजगता वाढवणे आवश्यक झाले आहे.

अमेरिकेतील नॅशनल टेलिमिडिया कौन्सिल गेल्या अर्धशतकापासून याबाबत प्रयत्नशील असून 'द जर्नल ऑफ मिडिया लिटरसी' नावाचे एक त्रैमासिकच ते प्रकाशित करत असतात.

भारतात या संदर्भात अजून कोणतीच पावले उचलली गेलेली नाहीत. माध्यम-साक्षरता म्हणजे काय व कशाशी संबंधित आहे वा तिने कशाकशाशी संबंधित असावे या संबंधाने अमेरिका-कॅनडा-युरोपियन राष्ट्रांमध्ये घडून गेलेली चर्चा व प्रयत्न आपल्याला उपयुक्त ठरणारे आहेत.

माध्यम-साक्षरतेचा अर्थ माध्यमांद्वारे उपलब्ध नव-नव्या संवाद-तंत्रज्ञानाचा वापर करून आपले म्हणणे मांडता येण्यापुरता मर्यादित नसून माध्यमांमधून चालणारी संवाद-संप्रेषणाची प्रक्रिया व व्यवहार तपासता येणे, त्याची चिकित्सा करता येणे, चिकित्सक मूल्यमापन करता येणे असा आहे.

माध्यमांमधली माहिती, मनोरंजन, वृत्त वा कोणताही संदेश-संप्रेषण व्यवहार कसा 'रचला' जातो, कोणत्या आर्थिक, सामाजिक, राजकीय, ऐतिहासिक, सौंदर्यविषयक चौकटीत, आधारावर अथवा व्यवस्थेत तो रचला जातो, तो 'जाणला जाताना' त्यात कोणत्या सांस्कृतिक बाबी कशा गुंतलेल्या असतात, माध्यमांची म्हणून जी 'भाषा' असते तिचे स्वरूप, वैशिष्ट्ये, ज्या 'भाषेत' हा व्यवहार चालतो त्या भाषेपासूनचे तिचे नेमके वेगळेपण, प्रत्यक्षात माध्यमाद्वारा 'धारण' करून 'पोचवलेले' रूप व त्यावर आधारलेली लोकांची समज, जाण, ज्ञान यांतला फरक या माध्यम-साक्षरतेचे स्वरूप स्पष्ट करणाऱ्या मुख्य बाबी होत.

माध्यमांच्या परिणामांपासून मुलांचा बचाव करावा की त्यांना 'सुरक्षित' राखण्याऐवजी त्यांना माध्यम-साक्षर करावे, त्यांना प्रत्यक्ष माध्यम-संदेशनिर्मितीची तंत्र-कौशल्ये सुरुवातीपासूनच शिकवावीत, संवाद-संप्रेषणात अंतर्भूत व अंगभूत अशा सांस्कृतिक, सामाजिक, राजकीय अशा त्याला चिकटून असणाऱ्या निहित स्तराचे चिकित्सक विश्लेषण करण्यास शिकवावे, शालेय पातळीपासूनच माध्यम-शिक्षण हा आवश्यक विषय ठेवावा व त्या त्या पातळीवर झेपतील असे अभ्यासक्रम तयार करावेत, जे सध्याही अनेक राष्ट्रांतून 'स्कोलॅस्टिक जरनॅलिझम' म्हणून उपलब्ध आहेत. हे सारे करताना महत्त्वाची समस्या ही माध्यम-कंपन्यांच्या आर्थिक सहयोगाने हे करावे की करू नये ही आहे. माध्यम-साक्षरता चळवळ उभारली जाण्याचे मूळ कारणच माध्यम-कंपन्यांनी 'घडवलेले आणि 'बिघडवलेले' जग हे असल्याने माध्यम-साक्षरता चळवळ ही माध्यम-कंपन्यांकडून पुरस्कृत होणारी चळवळ झाल्यास माध्यमांच्या शोषणाविरुद्धची ही चळवळ माध्यम-कंपन्या त्यांच्या हिताच्या दृष्टीने गिळंकृत करून संपुष्टात आणतील, असा एक मोठा विचारप्रवाह अमेरिका-कॅनडा-युरोपियन राष्ट्रांत आहे.

मात्र या चळवळीत काही समान गोष्टींवर सर्व-







अनुक्रमणिका

सहमती निर्माण झाली आहे. माध्यमातून चालणारी संवाद-संप्रेषणाची निर्मिती, तिचे वितरण आणि सतत घेतला जाणारा उपभोग याबाबत मात्र समाज अतिशय सजग असण्याची व ती सजगता निर्माण करण्याची गरज असल्याबद्दल कुणाचेच दुमत नाही. अगदी माध्यम-कंपन्यांचेदेखील नाही.

माध्यमातली संदेशनिर्मिती करणारे नेमके 'कोण' आहेत, त्या 'व्यक्ती' असल्या तरी त्या व्यक्ती म्हणजे माध्यम नव्हे व त्यांना हव्या त्या संदेशाची–संवादाची निर्मिती करण्याचे 'स्वातंत्र्य' त्यांना नाही, ते कोणाच्यातरी वतीने ते काम करतात, ज्यांच्या वतीने ते काम करतात ते 'कोण', त्यांच्या संवादाच्या विशिष्ट माध्यम-वस्तू निर्मिण्याचा वितरणाचा, हेतू काय, नेमके 'कोणापर्यंत', 'त्यांना' ते 'पोचावयंचे' असते, त्यांच्यापर्यंत का, इतर उरलेले त्यांच्या या उद्योगात का सोडून दिले जातात? माहिती–संवाद–संप्रेषणासाठी, लोकांचा अनुनय करून, त्यांच्या 'गळी विशिष्टच गोष्ट उतरवण्यासाठी', त्यांचे 'लक्ष वेधून ते टिकवून ठेवण्यासाठी' कोणकोणत्या तंत्राचा-कौशल्यांचा कसा 'वापर' केला जातो? माध्यमातून जो संवाद-संप्रेषण व्यवहार चालतो त्यातील माहितीची, आशयाची वास्तविकता, विश्वासार्हता, अचूकता, नेमके-पणा, ताजेपणा-शिळेपणा हे कसे तपासायचे? या साऱ्या संवादात जे वगळले जाते, ते कसे व किती महत्त्वाचे असते? ते 'काय' व ते कसे जाणून घ्यायचे? हे सारे माध्यम-साक्षरता चळवळींसाठी आत्यंतिक महत्त्वाचे प्रश्न आहेत.

लोक हे माध्यमांचे ग्राहक असल्याने तर या माध्यम-ग्राहकांच्या ग्राहक म्हणून असणाऱ्या अधिकारांबद्दलची जागृती करणारी 'माध्यम-ग्राहक चळवळ' म्हणूनही माध्यम-साक्षरता चळवळीकडे बघता येणे शक्य आहे.

युनेस्कोनेदेखील या दृष्टिकोणाची गांभीर्याने दखल घेऊन या दृष्टीने एक कार्यक्रमच तयार केला आहे. त्यात अगोदर शिक्षकांनाच माध्यम-साक्षरतेबाबत साक्षर करण्यासाठी अभ्यासक्रम तयार करण्यात येणार असून माध्यम-साक्षरतेचे निकष व निदर्शक अशी सुस्पष्ट मार्गदर्शक तत्त्वे निश्चित करणे व माध्यम-साक्षरतेसंबंधाने ज्ञान-संशोधन यासाठी उच्च शिक्षणाच्या पातळीवर वेगळी साधनसामग्री उपलब्ध करून देण्याचा समावेश आहे.

नव्या जगाच्या नव्या शक्यतांसाठी फक्त असे जग शक्य आहे एवढी श्रद्धा बाळगून आणि ते निर्माण करण्याचे काम करणारे करतील आपल्याला काय त्याचे, हा दृष्टिकोण बाळगून चालणार नाही. सर्वंकष शोषणाविरुद्ध उभे राहायचे तर मानवी मेंदूचे सर्वंकष नियंत्रण करणाऱ्या माध्यमसम्राटांचा माध्यम-व्यवहार सतत तपासत राहणाऱ्या माध्यम-साक्षरता चळवळीची नितांत गरज आहे आणि हे सामर्थ्य आहे चळवळीचे, पण 'जो जो करील तयाचे' आणि तो 'जो जो' हा आपल्यातलाच 'जो', 'तो' आपणच आहोत; कारण आपण सर्वच 'माध्यम-ग्राहक' आहोत.

☆☆☆

# मराठी भाषेचे संवर्धित भवितव्य : काही दिशा

डॉ. आशुतोष पाटील

मराठी भाषकांच्या स्वतंत्र राज्याची-महाराष्ट्र राज्याची-स्थापना होऊन आता अर्धशतक उलटले आहे. महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेनंतर मराठी भाषा आणि संस्कृती यांच्या संवर्धनाला गती आणि दिशा प्राप्त होईल, असे वाटत होते. भाषावार प्रांतरचनेच्या मागणीमागे उद्दिष्टही हेच होते. परंतु मराठी भाषा संवर्धित करण्याचे जाणीवपूर्वक आणि नियोजनबद्ध प्रयत्न सातत्याने झाले नाहीत किंवा जे काही प्रयत्न झाले ते पुरेशा सामर्थ्याने आणि दूरदृष्टीने केले गेले नाहीत. म्हणूनच येणाऱ्या काळात मराठी भाषेचे अस्तित्व टिकून राहील काय? असा चिंतेचा सूर आज सारखा एकू येत आहे. याबाबत विविध व्यासपीठां-वरून चर्चा केली जात आहे. ती चर्चा पूर्णतः गैरलागू म्हणता येत नाही. पण मराठी भाषेच्या संवर्धनाचा विचार करताना ती जिवंत राहणार आहे किंवा आपण ती जिवंत ठेवणार आहोत, हे पहिल्यांदा गृहीत धरायला हवे.

भाषासंवर्धनाच्या बाबतीत विचार करताना मुख्यतः तीन गोष्टी लक्षात घ्याव्या लागतात.

१. ती भाषा किती जणांकडून बोलली जाते?

२. निरनिराळ्या काळांतील आणि क्षेत्रांतील गरजा भागवण्यास ती कितपत सक्षम आणि लवचीक आहे?

३. तिचा वाङ्मयीन साठा किती सखोल आणि समृद्ध आहे?

या ठळक मुद्द्यांच्या अनुरोधाने मराठी भाषा-संवर्धनाच्या काही दिशा विचारात घेता येतील.

१. भाषा संवर्धित करायची म्हणजे प्रत्यक्षात काय करायचे, तर पहिली गोष्ट म्हणजे आपली भाषा हिरिरीने बोलायची. जास्तीत जास्त लोकांनी, जास्तीत जास्त ठिकाणी ती भाषा बोलणे हा कुठल्याही भाषेच्या संवर्धनाचा पहिला टप्पा आहे. भाषेच्या संवर्धनासाठी संख्यात्मक वाढ आणि वर्चस्व आवश्यक आहे. हिंदी व बंगालीच्या उदा-हरणावरून ते आपल्याला स्पष्ट दिसते. या बाबतीत मराठीची परिस्थिती आशादायक आहे. कारण आजच्या घडीला मराठी मातृभाषा असणाऱ्यांची संख्या सुमारे आठ-साडेआठ कोटी आहे. पुढच्या पन्नास वर्षांत ही संख्या भक्कमच राहणार. त्यामुळे सगळ्या ठिकाणी आपण मराठी हिरिरीने बोलले पाहिजे. ती बोलायला उगाच लाजायचे नाही. आपण आपल्या भूमीत भक्कम उभे आहोत, आपली भाषा ही जगातल्या प्रमुख भाषांपैकी एक आहे, आपण तिच्यात सर्व व्यवहार करू शकतो, या आत्मविश्वासाने ती बोलायची.

२. भाषेच्या सर्व बोली सांभाळणे आणि वाढविणे आवश्यक आहे. मराठीच्या अनेक बोली आहेत. त्यांतील वऱ्हाडी, कोकणी, अहिराणी असे ठळक भेद आपल्याला माहीत आहेत. पण त्या बोलींमध्येही पोटबोली आहेत. उदाहरणार्थ, कोकणात वारली, ठाकरी, कातकरी, आगरी, कुणबी, मालवणी असे अनेक भेद आहेत. मराठीचे संवर्धन व्हायचे असेल तर या प्रत्येक बोलीभाषेचा विकास झाला पाहिजे. सुशिक्षितांनी आपल्या बोलीभाषांची लाज न बाळगता आपापल्या समूहात आणि प्रदेशात दैनंदिन व्यवहारांत बोलीभाषेचाच वापर केला पाहिजे. याबरोबरच बोलीभाषांचे व्याकरण अद्ययावत करणे, त्यांच्यात साहित्य-निर्मिती करणे, त्या साहित्याचा गावोगाव प्रसार करणे याही गोष्टी प्राधान्याने कराव्या लागतील. कारण, मराठीचे संवर्धित भवितव्य हे बोलींच्या विविधतेत आणि त्यांच्या समृद्धीत सामावलेले आहे.

३. भाषाशिक्षण हा कुठल्याही भाषेच्या संवर्धनातील महत्त्वाचा भाग असतो. भाषाशिक्षणासाठी शाळा जरुरी आहे. पण या बाबतीत महाराष्ट्रातील परिस्थिती चिंताजनक आहे. अद्यापही शिक्षणाच्या प्रवाहापासून खूप मोठा वर्ग दूर आहे. त्यात पुन्हा मुलांपेक्षा मुलींचे शाळागळतीचे प्रमाण बरेच अधिक आहे. त्यामुळे मराठी भाषा शिकण्या-पासून बराच मोठा वर्ग वंचित राहत आहे. मराठी भाषेच्या संवर्धनाची चर्चा करायची असेल, तर पहिल्यांदा ही

अनुक्रमणिका

गळती थांबवली पाहिजे. समाजातल्या फार मोठ्या वर्गाला जर भाषेचे शिक्षणच मिळणार नसेल, तर भाषेच्या संवर्धनाची चर्चा करणे व्यर्थ आहे. सर्व मुले-मुली निदान दहावीपर्यन्त शिकतील आणि त्या काळात मराठी भाषेतून सुंदर आणि गुणवत्तापूर्ण शिक्षण त्यांना मिळेल असे पाहिले पाहिजे.

४. शिक्षणासाठी इंग्रजीसारख्या परक्या भाषेचा स्वीकार केल्याने मराठी धोक्यात आली आहे, या मुद्द्याचाही विचार येथे करणे अपरिहार्य ठरते. मराठी माध्यमातून शिकलेले लोक मराठी टिकवतील, ही कल्पनाच साफ चुकीची आहे आणि इंग्रजी माध्यमातून शिकलेले लोक मराठी बुडवतील, असे समजण्याचे कारण नाही. एकूणच मराठी विरुद्ध इंग्रजी माध्यम असा वाद घालत न बसता, अधिक मोकळया मनाने आणि संयमाने विचार करायला हवा. आज खरी गरज आहे ती मराठी माध्यमांच्या शाळेत अगदी इयत्ता पहिलीपासून चांगले दर्जेदार इंग्लिश शिकवण्याची आणि महाराष्ट्रात प्रत्येक इंग्रजी माध्यमाच्या शाळेत इयत्ता पहिलीपासून दर्जेदार मराठी शिकवण्याची. इंग्रजी माध्यमांच्या शाळांतून चांगली मराठी पुस्तके पुरवणी-वाचन म्हणून लावली पाहिजेत. आणि मुख्य म्हणजे प्रत्येक मराठी कुटुंबाने आपल्या मुलांना सुंदर आणि दर्जेदार मराठी साहित्य आपल्या घरात उपलब्ध करून दिले पाहिजे. इंग्रजी माध्यमाच्या शाळांना नाक मुरडून चालणार नाही, तर अशा शाळांमधून अमराठी मुलांना मराठीच्या कक्षेत आणण्यासाठी प्रयत्न करावे लागतील. दुसऱ्या बाजूला मराठी माध्यमाच्या शाळांमधील मराठीचा दर्जा उच्च कसा राहील, यासाठीही ठोस पावले उचलावी लागतील. (यासंबंधी एक उदाहरण येथे नमूद करायला हरकत नाही. १९९३च्या सुमारास मीनल परांजपे यांनी मराठी माध्यमांच्या शाळांतील मुलांना इंग्रजी भाषेत पारंगत करणारा Functional English नावाचा तिसरी ते आठवीपर्यंत राबविता येईल असा अभ्यासक्रम तयार केला. आणि २००६ पर्यंत मराठी माध्यमांच्या बारा शाळांमध्ये तो यशस्वीरीत्या शिकविला. हा उपक्रम सर्व मराठी शाळांना बंधनकारक केला असता, तर मराठी शाळांच्या दुर्दशेला काही प्रमाणात प्रतिबंध झाला असता.)

५. भाषेच्या संवर्धनामध्ये ती भाषा निरनिराळी कामे करण्यासाठी सक्षम आणि लवचीक करणे हीही एक महत्त्वाची दिशा आहे. त्यासाठी मराठी भाषेचे दरवाजे नवनवीन बदलांना कायम उघडे ठेवावे लागतील. ज्ञानासाठी इतर भाषेतील शब्द आपल्या भाषेत वापरणे म्हणजे अपराध आहे, असे मानण्याचे कारण नाही. विशेषतः समाजात नवीन तंत्रज्ञान येते आणि अन्य भाषा आणि संस्कृती यांच्याशी संबंध येतो, तेव्हा परभाषेतला शब्द आपण जसाच्या तसा उचलतो किंवा त्या शब्दामध्ये बदल वा मोडतोड करून निराळा शब्द तयार करतो किंवा परभाषेतील शब्दाला प्रतिशब्द तयार करतो. अशा विविध स्तरांवरून मराठी भाषेत शब्दांची भर सतत पडत राहिली पाहिजे.

६. भाषेचे संवर्धन व्हायचे तर सामाजिक व्यवहाराच्या सर्व क्षेत्रांत तिचा प्रवेश व्हायला हवा. आज माहिती आणि ज्ञानाच्या क्षेत्रात इंग्रजीचा बोलबाला आहे. त्यामुळे समाजव्यवहारतही इंग्रजीचाच वरचष्मा असणे स्वाभाविक आहे. पण प्रश्न आहे तो इंग्रजीतील ज्ञानसंपदा मराठीत आणण्यासाठी आपण किती प्रयत्नशील आहोत याचा. या प्रश्नाच्या सकारात्मक आणि कृतिशील उत्तरावर मराठीच्या उज्ज्वल भवितव्याची दिशा बरीचशी अवलंबून आहे. त्यासाठी प्रत्येक विषयाची पुस्तके मराठीतून उपलब्ध होणे गरजेचे आहे. विज्ञानातील संज्ञा, संकल्पना, व्यक्ती आणि संस्था यांवरील साडेतीन हजार नोंदीचा समावेश असलेला कोश मराठी विज्ञान परिषद आणि महाराष्ट्र साहित्य आणि संस्कृती मंडळ प्रकाशित करीत आहे, ही निश्चितच महत्त्वाची गोष्ट आहे. विश्वकोश, शासन-व्यवहारकोश, शब्दकोश, परिभाषाकोश यांसारखे मराठीला ज्ञानभाषेचा दर्जा प्राप्त करून देण्याचे प्रयत्न झाले आहेत, आजही ते सुरू आहेत. परंतु, अशा प्रयत्नांचे नेमके महत्त्व, त्यांची उपयोगिता, त्यांचे प्रत्यक्षात भाषिक, वाङ्मयीन, ज्ञानात्मक कामातील उपयोजन यांसंबंधी मराठी भाषक समाज उदासीन आहे. कोश-पुस्तके-ज्ञानसंचय तयार होत राहिले आणि ते सर्व सरकारी खात्यांतून, गोडाउन्समधून, क्वचित ग्रंथालयांतून आणि मोजक्या जाणकार व्यक्तींच्या घरांतून पडून राहिले. मराठी विश्वकोशात जगातील सर्व ज्ञानविज्ञान मराठी भाषेत मांडलेले आहे. पण त्याचे मर्म समाजाला समजावून सांगण्याची

काळजी कोणी घेतलीच नाही. हे काम करण्यासाठी जितक्या तातडीने आणि निष्ठेने मराठी भाषक समाज लागेल, तितक्या त्वरेने मराठी भाषासंवर्धनाचा मार्ग प्रशस्त होत जाईल.

७. अधिकाधिक लोकांना मातृभाषेतून ज्ञान उपलब्ध करून देणे हे आव्हान सर्वच भाषांना स्वीकारावे लागणार आहे. यासाठी भाषांतरकौशल्य विकसित करून, उत्तम भाषांतरकार घडवून, इंग्रजीच नव्हे तर इतर भाषांमधील ज्ञान-माहिती मराठीत आणून, या ज्ञानाचे अभिसरण वाढवून एक व्यापक ज्ञानव्यवस्था मराठीत उभारावी लागेल. 'केल्याने भाषांतर'सारखे नियतकालिक, 'माय-मावशी' सारखा अंक, साने गुरुजी राष्ट्रीय स्मारकाचे आंतरभारती अनुवाद सुविधा केंद्र, मेहता, साकेत यांसारखे काही प्रकाशक यांच्या माध्यमातून भाषांतरासाठी सुरू असलेले काम महत्त्वाचे आहे. परंतु ते अधिक व्यापक स्तरावर आणि प्राधान्याने होणे गरजेचे आहे. तसेच केवळ कथा, कादंबरी अशा ललित साहित्यापुरते भाषांतरित साहित्याचे क्षेत्र मर्यादित न राहता विज्ञान, व्यवसाय, व्यवस्थापन, समाजशास्त्र, राज्यशास्त्र, मानववंशशास्त्र यांसारख्या विविध क्षेत्रांतील मजकुराच्या भाषांतरासाठीही तातडीने पावले उचलायला हवीत. एक व्यापक भाषांतर-ज्ञानप्रकल्प हाती घ्यायला हवा. सर्व विद्यापीठांमध्ये भाषांतरविद्येचा अभ्यासक्रम यावा. महाराष्ट्र ज्ञान मंडळाने (एम. के. सी. एल.ने) एम. एस. सी. आय. टी.सारखा अभ्यासक्रम सर्वांसाठी मराठी माध्यमातून उपलब्ध करून दिला आहे. त्याच धर्तीवर बायलिंग्वल भाषासाधनांचे विकसन करण्यासाठी महाराष्ट्र ज्ञान मंडळाने पुढाकार घ्यायला हवा.

८. जागतिकीकरणामुळे होत असलेल्या सांस्कृतिक सपाटीकरणाचे भान बाळगतानाच या अपरिहार्य स्थित्यं-तराचा लाभ घेत मराठीला संवर्धित भवितव्याच्या दिशेने नेण्यासाठी काही ठोस पावले टाकणे शक्य आहे.

(अ) जागतिकीकरणात रिटेलिंग म्हणजे किरकोळ विक्री, लघुकर्ज, विमा-विशेषतः आरोग्यविमा-अशा विविध क्षेत्रांतील कंपन्या त्यांच्या फायद्यासाठी लहानातील लहान खेड्यात-वस्तीत पोचण्याचा प्रयत्न करीत आहेत. त्यांना प्रत्येक माणसाशी संपर्क साधण्यात रस आहे. त्यासाठी अधिकाधिक जाहिराती, माहितीपत्रके ही प्रादेशिक भाषेत प्रसिद्ध व्हावीत, अशा प्रयत्नांत या कंपन्या आहेत. परदेशी संशोधक साहित्य, समाजशास्त्र, आरोग्याचे प्रश्न अशा अनेक क्षेत्रांत संशोधन करत आहेत. तेही प्रादेशिक भाषा शिकून लोकांशी संपर्क साधण्याच्या प्रयत्नात असलेले दिसतात. जागतिकीकरणाच्या बाजारपेठेतले आणि संशोधनातले हे प्रवाह प्रादेशिक भाषा प्रबळ करण्यासाठी पोषक असेच आहेत. याचा फायदा परकीय गुंतवणुकीत देशात प्रथमस्थानावर असणाऱ्या महाराष्ट्र राज्यातील मराठी भाषकांना आपल्या भाषेच्या संवर्धनासाठी निश्चितच करून घेता येईल.

(आ) बांधकाम, विमा, फॅशन डिझायनिंग, प्रसार-माध्यमे आणि मनोरंजन, पर्यटन, इव्हेंट मॅनेजमेंट अशा विविध सेवाक्षेत्रांमध्ये जागतिकीकरणामुळे तांत्रिक भाषेची जास्त गरज भासत नाही. अशा क्षेत्रांमध्ये मराठी तरुणांनी येऊन प्रगतीबरोबर मराठी भाषेचाही प्रसार केला पाहिजे. पण त्यासाठी नुसत डॉक्टर आणि इंजिनियर होण्याकडे मराठी भाषकांनी आपली मुले पाठवून चालणार नाही.

(इ) आजच्या काळातले टी. व्ही. हे सर्वांत प्रभावी माध्यम आहे. आज पाच मराठी टी. व्ही. चॅनेल्स उपलब्ध आहेत. त्यांच्या कार्यक्रमातील मराठी भाषा ही अचूक नसेल. पण आपण हे लक्षात घ्यायला पाहिजे की, आज मोठ्या प्रमाणात मराठी भाषक समाज हा हिंदी आणि इंग्रजी टी. व्ही. चॅनेल्स सोडून रोज सकाळी भविष्य ऐकायला बसतो, सारेगमपमधील मराठी गाणी ऐकत बसतो. हे माध्यम अगदी दुर्गम भागातही पोचले आहे आणि आता तर ते सातसमुद्रांपलीकडेदेखील पाहिले जाते आणि ते पाहणाऱ्या लोकांची संख्या काही कोटींच्या घरात आहे. या माध्यमामुळे मराठीचा नकळत का पुष्कळ होईना, प्रसार होत आहे. या प्रभावी माध्यमामध्ये काम करणाऱ्यांनी जाणीवपूर्वक काम केले पाहिजे. आणि तशी आपली नम्र विनंती व आग्रह असला पाहिजे.

(ई) आज संगणक-इंटरनेटयुगात मराठीला जागतिक स्तरावर विस्तार पावणाऱ्या चांगल्या संधी निर्माण झालेल्या आहेत. अगदी अलीकडेपर्यंत संगणकावर मराठी हे इंग्लिश भाषेसारखे रोमन लिपीतून लिहावे लागायचे. आज सॉफ्टवेअरच्या मदतीने संगणकावर देवनागरीत

मराठी लिहिता येणे शक्य झाले आहे आणि आता युनि-कोडमुळे हे आणखी सोपे झाले आहे. या (www. shodhmarathicha.com संकेतस्थळावर मराठी युनि-कोड मोफत उपलब्ध आहे. त्याला 'सोप्पी मराठी' असे नाव दिले आहे.) 'विकिपिडिया' सारख्या जागतिक ज्ञान-कोशात इतर भाषांच्या बरोबरीने मराठीतून ज्ञानसंक्रमण करण्याचे माध्यम खुले झाले आहे. मायक्रोसॉफ्टने संगणकावर मराठीतून सर्व प्रकारचा पत्रव्यवहार, माहितीची साठवणूक, हिशेब ठेवण्याची सुविधा उपलब्ध करून दिली आहे. मराठी-इंग्रजी शब्दकोश, शुद्धलेखनाची आज्ञावली आता संगणकाच्या पडद्यावर, इंटरनेटच्या महाजालावर उपलब्ध आहे. मराठी वर्तमानपत्रे इंटरनेटच्या माध्यमातून जगातल्या कुठल्याही कोपऱ्यात आता वाचता येतात. विशेष म्हणजे गुगलवर आपल्याला हवं ते सर्च केलं तर मिळतंच, पण विशेष विषयांसाठी खास साइट असेल तर अधिक सोपं. मायबोली, मराठी सृष्टी, मराठी साहित्य या वेबसाईट्स काम करतात. यामुळे घरबसल्या जुनं-नवीन साहित्य वाचायला मिळतंय. वेब, ब्लॉग, रेडिओ यांमुळे प्रकाशकाच्या मध्यस्थीशिवाय कुणालाही आपले लेखन, मनोगत आपल्या भाषेत व्यक्त करण्याची संधी मिळाली आहे. या बाबींचा लाभ घेत मराठी भाषक समाजाने संगणकइंटरनेटचा वापर करताना शक्य असेल त्या त्या ठिकाणी मराठीचाच वापर केला पाहिजे.

९. मराठी भाषक समाजाची प्रवृत्ती आणि इतिहास लक्षात घेता कला, सामाजिक विचार आणि अध्यात्म या तीन क्षेत्रांमध्ये मराठीचे संवर्धन प्रभावीपणे होऊ शकते. जगात आपल्या भाषेचा जर खरोखरच प्रभाव पाडायचा असेल, तर आपल्याला तिच्यात अफाट दर्जाचे साहित्य निर्माण करावे लागेल. हे काम होण्यासाठी वाचनाची भरघोस परंपरा जशी हवी, तसेच उत्साहवर्धक वाङ्मयीन वातावरण हवे. सध्या दिखाऊपणा, कंपूशाही, साहित्यिकांचे क्षुद्र अहंकार आणि विचारवंतांमधला तुच्छतावाद यांमुळे मराठीचा शक्तिपात होतो आहे. तो थांबवून मराठी वाङ्मयविश्वाने एकदिलाने आपली सगळी ताकद मराठीच्या उत्कर्षासाठी लावली पाहिजे. तसेच सामाजिक आणि आध्यात्मिक विचार ही मराठीची ताकद आहे. अशा विचाराची मराठीतील परंपरा जुनी आणि भारतीय भाषांमध्ये अग्रगण्य स्वरूपाची आहे. या परंपरेची ताकद पुढच्या काळात अधिक वाढवली पाहिजे. मात्र हा विचार पठडीबाज, झापडबंद न होता निकोप, मोकळा व सुसंवादी झाला, तर त्या विचारांची शक्ती तर वाढेलच; पण त्याचा जनसामान्यात प्रसारही होईल. कला, साहित्य, सामाजिक विचार, अध्यात्म या क्षेत्रांमध्ये मराठी भाषकांनी आपले सर्व सामर्थ्य पणाला लावले, तर मराठीच्या संवर्धनाचा मार्ग निश्चितच सुकर होईल.

मराठी भाषा खरोखर समर्थ व्हायची असेल, तर तिच्याविषयीचा मराठी भाषक समाजाचा दृष्टिकोण बद-लायला हवा. मराठी भाषेवरचे आपले प्रेम प्रतिक्रियात्मक, सापेक्ष आणि नकारात्मक असता कामा नये. मराठी भाषकांची वृत्ती अधिक व्यवहारी आणि आधुनिक व्हायला हवी. मायबोली या शब्दाने (खरोखर किंवा नाटकीपणे) हळवे न होता, तिच्याविषयीच्या अभिमानाचे उमाळे काढत न बसता, भाषिक अस्मितेच्या लबाड राजकारणाला न भुलता, अन्य भाषांसंबंधीचे पूर्वग्रह उराशी न बाळगता मराठी भाषा काल-परवा कशी होती, याची तटस्थपणे जाणीव करून घ्यायला हवी, तिच्या चालू रंगरूपातील दोष आणि ढोंग यांचा नायनाट करायला हवा, उद्याच्या जबाबदारीसाठी ती समृद्ध कशी होईल याचा स्वच्छ विचार व्हायला हवा.

☆☆☆

**ग्रंथजिज्ञासा**

# सर विठ्ठलदास दामोदर ठाकरसी

– प्रा. श्री. मा. भावे

ग्रंथालयात कधी अचानक एखादे दुर्लक्षित पण महत्त्वाचे पुस्तक आढळून येते. तीच गोष्ट माझ्या बाबतीत झाली. सर विठ्ठलदास दामोदर ठाकरसी यांचे गुजराती चरित्र ग्रंथालयाच्या एका कोपऱ्यातील कपाटात मला सापडले. या पुस्तकाचे प्रथमदर्शनी कळून येणारे वैशिष्ट्य हे की, पुण्याच्या 'आर्यभूषण छापखान्या'त ते १९३२ साली छापलेले आहे! त्यासाठी छापखान्याने गुजराती अक्षरांचे खिळे पाडून घेतले. जुळाऱ्यांना गुजराती अक्षरे जुळविण्याचे शिक्षण दिले व मुद्रण सिद्धीस नेले. पुस्तकाचे प्रकाशक होते विठ्ठलदासांचे बंधू माधवजी. ते मुंबईचे. पुस्तकाचे लेखक कल्याणदास नथुभाई जोषी हे द्वारकेचे. मग छपाई आर्यभूषण छापखान्यात का?

याचे कारण असे की, विठ्ठलदास यांना (त्या वेळचे) पुणे शहर फार आवडायचे. त्यांनी संगमाजवळच्या टेकडी-वर 'पर्णकुटी' हा अलिशान प्रासाद बांधला होता. विठ्ठल-दासांचे सर्व कागदपत्र 'पर्णकुटीत'च होते. विठ्ठलदास वारल्यावर त्यांचे चरित्र लिहिण्याचे काम विठ्ठलदासांच्या पत्नी प्रेमलीलाबाई व बंधू माधवजी यांनी कल्याणदास यांच्यावर सोपवले व त्यांनी पर्णकुटीत राहून पुरे केले. भारत सेवक समाजाचे अध्यक्ष व सेवासदन संस्थेचे प्रमुख गोपाळ कृष्ण देवधर यांची ठाकरसी कुटुंबीयांशी फार जवळीक होती आणि आर्यभूषण छापखाना भारत सेवक समाजाच्या मालकीचा होता. त्यामुळे देवधरांनी आत्मीयतेने पुस्तक-छपाईचे काम आर्यभूषण छापखान्याला घ्यायला लावले असेल. तसेच, ठाकरसी परिवार धनत्तर असल्याने छापखान्याला पैसाही चांगलाच मिळाला असणार. पुस्तकावर किंमत छापलेली नाही. यावरून पुस्तक खासगीत वाटण्यासाठी तयार केले असावे, असे दिसते.

विठ्ठलदास ठाकरसी यांची माहिती आताच्या लोकांना फारशी असण्याची शक्यता नाही. येरवड्याला जाताना टेकडीवरील 'पर्णकुटी' अनेकांच्या दृष्टीस पडत असेल. पण दुचाकी-चारचाकी वाहनातून झपाट्याने जाणाऱ्या कुणालाच 'हा राजवाडा कुणाचा?' ही चौकशी करायला फुरसत झाली नसेल. हल्ली माणसाच्या आयुष्याला इतका वेग आला आहे की, एस्.एन्.डी.टी. विद्यापीठाचे संपूर्ण नाव काय याचा उलगडा करून घेण्याइतका चौकसपणाही फारच थोड्यांना परवडतो. पण या विद्यापीठाला 'श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ' असे लांबच लांब नाव मिळण्याचे कारण हे होते की, नाथीबाईंचे पुत्र विठ्ठलदास यांनी १५ लाखांची, त्या काळातली घसघशीत रक्कम, देणगी म्हणून अण्णासाहेब कर्वे यांना दिली व त्यातून 'महिला महाविद्यालया'चे विद्यापीठात रूपांतर झाले. या देणगीसाठीही गोपाळ कृष्ण देवधर यांची ओळखच उपयोगाला आली होती.

विठ्ठलदास व त्यांचे ठाकरसी घराणे यांचे पुण्याशी व महाराष्ट्राशी घनिष्ठ संबंध होते. ठाकरसींचे उद्योग मुंबई शहरात व सौराष्ट्रात होते. पण त्यांचे औदार्य मात्र महाराष्ट्राच्या वाट्याला मोठ्या प्रमाणात आले. 'गोखले एज्युकेशन सोसायटी'ला ठाकरसींनी चांगलीच मदत केली. या संस्थेचे 'हंसराज प्रागजी ठाकरसी' महाविद्यालय नाशिकला आहे. हे 'हंसराज प्रागजी' विठ्ठलदासांचे चुलत भाऊ. सेवासदन संस्थेने निराधार स्त्रियांसाठी काम केले व आपली एक शाखा साताऱ्याला काढली. त्यालाही विठ्ठलदासांनी मदत केली होती. पुढे विठ्ठलदासांनी पुण्यातच राहण्याचे ठरविले. यासाठी संगमानजीकच्या टेकडीवर १४००० चौ. फू. जागा त्यांनी विकत घेऊन मोठा वाडा बांधला. या वाड्याचे स्थापत्यही गोखले नावाच्या मराठी माणसाकडूनच करून घेतले. विठ्ठलदासांचा आग्रह असा होता की, जमिनीच्या उंच-सखलपणात कोणताही बदल न करता घर बांधावयाचे. या विशाल 'पर्णकुटीत'च पुढे १९४५ साली महात्मा गांधी काही दिवस राहिले होते.

(१)

देशातील अनेक उद्योगी जमातींप्रमाणे भाटिया ही








जमातही देशाबाहेरून पश्चिमेकडून आली. त्यातील काही माणसे पंजाब, पश्चिम उत्तरप्रदेश व राजस्थान या भागांत पसरली व काही आणखी दक्षिणेला येऊन सौराष्ट्राच्या किनाऱ्यावर वसती करून राहिली. इराण, अरबस्तान व आखाती देश यांच्याशी त्यांचा व्यापार समुद्रमार्गाने चाले. आपली अशी समजूत आहे की, परंपरेने हिंदूंना 'सिंधुबंदी' केली होती. पण ते खरे नाही. समुद्र ओलांडून जाण्यास बंदी असली तरी किनाऱ्या-किनाऱ्याने आपले व्यापारी दूरवर जात. नाहीतरी युरोपातदेखील कोलंबस हा पहिला दर्यावर्दी असा निघाला की, ज्याने समुद्र पार केला. एरवी युरोपातली जहाजेही एका बाजूला किनारा दिसतो आहे अशा बेतानेच समुद्रातून जात असत. असो. हे भाटिया लोक उच्चवर्णीय होते. ते मांसाहार करीत नसत आणि मुलांची मुंज करीत. धर्मलसी, देवभक्त आणि परंपरानिष्ठ अशी त्यांची वर्तणूक असे.

पश्चिम हिंदुस्थान - म्हणजे महाराष्ट्र व गुजरात - इंग्रजांनी पेशव्यांकडून जिंकून घेतला व त्याचा मुंबई इलाखा तयार करून मुंबईला त्याची राजधानी ठेवली. त्यानंतर आपल्याकडील हुशार आणि होतकरू मुले मुंबईला येऊन इंग्रजी शिक्षण घेऊ लागली व इंग्रजांच्या राजवटीला उपकारक अशा नोकऱ्या पतकरून मुंबईत राहू लागली. भांडारकर, मंडलिक, रानडे, चंदावरकर ही त्यांतली काही शेलकी नावे. त्याचप्रमाणे भाटिया जातीची मुलेही सौराष्ट्रातून जहाजाने मुंबईत येऊन व्यापार-उद्योग करून नावारूपाला येत. विठ्ठलदास यांचे आजोबा ठाकरसी मूळजी हे द्वारकेचे. तेथून वयाच्या १८ व्या वर्षी आठशे रुपयांचा माल घेऊन ते मुंबईत आले व पहिल्याच व्यापारात त्यांना खोट आली. ही नामुष्की पत्करून परत द्वारकेला जाण्यापेक्षा त्यांनी मुंबईतच राहायचे ठरविले. नंतर माणेकजी नासरवानजी पेटिट या धनाढ्य पारश्याच्या भागीदारीत त्यांनी चांगला नफा कमाविला.

ठाकरसी मूळजी यांचा मुलगा दामोदर. यांचा जन्म १८४७ साली झाला. १८६० पर्यंत त्यांनी काही शालेय शिक्षण घेतले आणि वयाच्या १३ व्या वर्षी वडिलांच्या पेढीत कामाला लागले. या वेळी या पेढीत ठाकरसी मूळजी यांचे पुतणे विश्राम मावजी हे काम बघत असत. १८७० साली दामोदर यांनी 'ठाकरसी मूळजी' या नावाची स्वतंत्र पेढी मुंबईच्या कोटात (फोर्ट भागात) काढली. यानंतर दामोदर यांचा उद्योग व श्रीमंती वाढतच गेली. त्यांनी १८७३ मध्ये 'हिंदुस्थान स्पिनिंग आणि वीव्हिंग मिल', १८७८ मध्ये 'ठाकरसी मूळजी मिल', १८७९मध्ये 'वेस्टर्न इंडिया स्पिनिंग व मॅन्युफॅक्चरिंग मिल' आणि शेवटी 'हाँगकाँग मिल' अशा चार कापड गिरण्या काढल्या. त्या काळी या चार गिरण्यांत मिळून ४० लाख ५० हजार इतके भांडवल गुंतले होते आणि ४९५० कामगार नोकरी करीत होते. सारांश, दामोदर ठाकरसी शेठ हे मुंबईतील मातब्बर असामी झाले होते.

या काळात मुंबईत सार्वजनिक हालचाली नुकत्याच सुरू झाल्या होत्या. इंग्रज सरकारही होतकरू, धनिक आणि घरंदाज मनुष्यांना सार्वजनिक कार्यात भाग घेण्याला उत्तेजन देत होते. दामोदर शेठलाही संस्थांमध्ये काम करण्याची हौस होती. नवीन शिक्षण, नवी माहिती व रीतिरिवाज शिकण्याची उत्सुकता होती. त्यामुळे 'मुंबई प्रेसिडेन्सी ॲसोसिएशन', 'रॉयल एशियाटिक सोसायटी', 'मूळजी जेठाभाई ग्रंथालय', 'आर्य सुधर्मोदय सभा' आणि पुण्याची 'सार्वजनिक सभा' यांच्या कामात त्यांनी भाग घेतला. १८८४ पासून १८८८ पर्यंत ते मुंबई महानगर-पालिकेचे सभासद होते. या त्यांच्या कामामुळे त्यांना सरकारकडून 'जस्टिस ऑफ पीस' हा अधिकार मिळाला. ठाकरसी यांचे मूळ वतन द्वारका. मुंबईत स्थिरावले आणि नावारूपाला आले तरी ठाकरसी कुटुंबाने सौराष्ट्राशी कायमचे संबंध ठेवले होते. खुद्द द्वारका गायकवाडांच्या हद्दीत होती. आसपास नवानगर, भावनगर, जुनागढ ही संस्थाने होती. ठाकरसी भांडवलदार झाले तेव्हा हे संस्थानिकही ठाकरसींशी आत्मीय संबंध ठेवू लागले.

१८९३ साली मुंबईत हिंदु-मुसलमानांचा पहिला दंगा झाला. वातावरण तापले व दोन्ही जमातीत अतिशय कडवटपणा निर्माण झाला. दामोदरशेठ यांचे मूळजी जेठा मार्केट येथे कापडाचे दुकान होते व कापड व्यापारातील ते वजनदार पुढारी होते. शेठ दामोदर आणि शेठ धरमसी सुंदरदास यांनी त्या वेळी एक पत्रक काढून व्यापाऱ्यांना समज दिली की, 'हिंदू आणि मुसलमान या दोन्ही जमातींच्या गिऱ्हाइकांशी आपण समभावाने वागले पाहिजे. मुसल-मानांना कोणत्याही प्रकारची तोशिस पडू देऊ नये. हिंदू

व मुसलमान या दोन्ही जमाती एकत्रच राहतात व उठतात–बसतात, व्यापार करतात. परंपरेने त्यांच्यात सलोखा नांदत आला आहे. त्यामुळे आजवर आपला जसा व्यवहार राहिला, तसाच तो पुढेही ठेवला पाहिजे.'

(२)

दामोदरशेठ व त्यांची बायको नाथीबाई यांचे चिरंजीव विठ्ठलदास हे १८७३ साली जन्मले. शाळेत ते हुशार व अभ्यासू विद्यार्थी होते. १८९१ च्या डिसेंबरात ते पहिल्याच प्रयत्नात मॅट्रिक झाले. भाटिया जमातीत शिक्षणाला फारसे महत्त्व दिले जात नसे. विठ्ठलदासांबरोबर आणखी फक्त तिघे भाटिया तरुण मॅट्रिक झाले. शिक्षणाला महत्त्व नसले तरी शील, सद्‌गुण व सद्‌वर्तन यांना महत्त्व असे. ठाकरसींच्या घरात उपदेशपर वचनांचे तख्ते भिंतींवर लावलेले असत व तुळयांवर भक्तीपर दोहे लिहिलेले असत. वाचलेल्या पुस्तकातील सुंदर उतारे वहीत घेण्याची सवय विठ्ठलदासांना वडिलधाऱ्यांनी लावली होती.

विठ्ठलदास फक्त एका सत्रापुरते एल्फिन्स्टन महाविद्यालयात गेले व १८९२ साली वडलांच्या उद्योगात सामील झाले. तथापि कोण्या विद्वानाला मित्रत्वाच्या मिषाने पदरी बाळगून त्याच्या सहवासात अर्थशास्त्र, व्यापार, इंग्रजी या विषयांचा पद्धतशीर अभ्यास करावा, असे त्यांनी ठरवले. त्यामुळे प्रथम काही दिवस केशवराव देशपांडे (हे पुढे बॅरिस्टर होऊन बडोदा संस्थानात नोकरीला लागले.); नंतर दा. ग. पाध्ये व शेवटी बॉम्बे स्कॉटिश एज्युकेशन सोसायटीतील जेम्स मॅक्डोनल्ड यांच्या संगतीत त्यांनी आपला अभ्यास चालवला. या शिक्षकमित्रांशी त्यांचे संबंध दीर्घकाळपर्यंत फार जिव्हाळ्याचे राहिले. दा. ग. पाध्यांनी सार्वजनिक हालचालीत विठ्ठलदासांना साथ दिली. मॅक्डोनल्ड यांना स्कॉटिश सोसायटी निवृत्तिवेतन देऊ शकेना, तेव्हा विठ्ठलदासांनी पैसे गोळा करून सोसायटीच्या निवृत्तिवेतननिधीत भर घातली व मॅक्डोनल्ड यांचे निवृत्तिवेतन चालू राहिले.

१८९२ सालच्या अखेरीस विठ्ठलदासांनी कुटुंबाच्या उद्योगात लक्ष घालायला सुरुवात केली आणि १८९३ साली दामोदरदास यांचा मृत्यू झाला. विठ्ठलदासांवरच सर्व जबाबदारी वयाच्या विसाव्या वर्षी येऊन पडली. धाकटा भाऊ माधवजी खूपच लहान होता. पण विठ्ठलदासांनी सारा कारभार फार उत्कृष्ट रीतीने सांभाळला. मूळ उद्योग जो कापड-व्यापार आणि कापड-गिरण्या, त्याचे तर त्यांनी जतन केलेच; पण इतर नवीन उद्योग वाढविण्याचा त्यांनी प्रयत्न केला. द्वारका, जबलपूर व कटनी इथे त्यांनी सिमेंटचे कारखाने काढले. मालवाहतूक व प्रवाशांची वाहतूक सोयीची व्हावी म्हणून त्यांनी द्वारका-जामनगर रेल्वे काढली. या रेल्वेफाट्यामुळे द्वारका जिल्ह्याचे सगळे रूपच पालटून गेले. एकेकाळी द्वारका हा उखीरवाखीर व दुष्काळी जिल्हा होता. तेथील बंदरही निरुपयोगी होऊन दुर्लक्षित झाले होते. पण या रूळ मार्गामुळे द्वारका व आसपासच्या भागावर नवी तुकतुकी आली.

उद्योगाला पैसे पुरविण्यासाठी बँकांचा उत्तम उपयोग होतो, याची पक्की जाण विठ्ठलदासांना होती. १९ व्या शतकाच्या अखेरीला देशी बँका नव्हत्याच. परिणामी देशातील शिलकी पैसे परकीय बँकांत ठेवले जात आणि परदेशी भांडवलदारांना त्यांचा उपयोग होई. १९०५ साली बंगालची फाळणी झाली व स्वदेशी चळवळीने जोर धरला. बँकेच्या व्यवहारात तेव्हा चुनीलाल धर्मादास सरैय्या यांचे फार नाव होते. सरैय्या हे डॉक्टर होते पण सराफी आणि बँकिंग या उद्योगांत त्यांना प्रतिष्ठा होती. सरैय्यांना हाताशी धरून विठ्ठलदासांनी एक जॉइंट स्टॉक कंपनी काढली व त्या कंपनीचा उद्योग म्हणून 'स्पिसी बँक' ही स्वदेशी बँक काढली. या बँकेचे विठ्ठलदास हे अध्यक्ष झाले व चुनीलाल सरैय्या मॅनेजिंग डायरेक्टर झाले.

थोड्याच दिवसांत स्पिसी बँकेचा मोठा बोलबाला झाला. मुंबई इलाख्यातील (या इलाख्यात त्या वेळी सिंधचाही समावेश होता.) सर्व महत्त्वाच्या शहरांतून बँकेच्या शाखा निघाल्याच; पण लंडनलाही एक शाखा काढण्यात आली. विठ्ठलदास बँकेचे कायमचेच अध्यक्ष झाल्यासारखे होते. कारण त्यांची मुदत संपल्यावर त्यांचीच पुनः अध्यक्ष म्हणून निवड होई. विठ्ठलदासांचा चुनीलाल सरैय्यांवर पूर्ण विश्वास होता. त्यामुळे सरैय्या हेच कायमचे मॅनेजिंग डायरेक्टर झाले होते. परस्परविश्वासावर काम चालत असल्याने सरैय्यांच्या व्यवहारात विठ्ठलदास लक्ष घालीत नसत. सरैय्यांच्या कामाविषयी बऱ्याच तक्रारी








विठ्ठलदासांकडे येत. पण त्यांनी त्यात फारशी चौकशी कधी केली नाही. इकडे सरैय्या यांनी बँकेचा पैसा सट्ट्यात गुंतवला, लफंग्या माणसांना कागदोपत्री भरपूर व्याज लावून पैसे दिले आणि बँकेच्या हिशेबात ते अनेक वर्षे बक्कळ नफा दाखवीत आले. ही सूज फार काळ टिकणारी नव्हतीच. १९१३ साली बँकेच्या कारभाराविषयी बाजारात अनेक हकीकती पसरू लागल्या. भयभीत झालेले ठेवीदार आपल्या ठेवीचे पैसे परत मागू लागले. २९ नोव्हेंबर १९१३ ला बातमी आली की, चुनीलाल सरैय्यांचे देहावसान झाले. त्याच दिवशी ठेवीदारांच्या मागणीवरून सरकारने बँक ताब्यात घेतली व बँकेचे व्यवहार गुंडाळण्यासाठी एक अधिकारी नेमला.

या सगळ्याचा मोठा आघात विठ्ठलदासांवर झाला. सरकारने त्यांना 'जस्टिस ऑफ पीस' हा किताब १८९७ साली दिला होता तो काढून घेतला. आर्थिक नुकसानही पुष्कळ झाले. आपल्यावर विश्वसून असणाऱ्या लोकांचे पैसे आपल्या हलगर्जीपणामुळे बुडाले, याची खंत त्यांना कायम वाटत राहिली. तथापि, विठ्ठलदास यांनी हिम्मत सोडली नाही व बँकिंग क्षेत्रातील पुढारी लोकांचा त्यांच्या-वरील विश्वासही कमी झाला नाही. स्पिसी बँकेची वाताहत झाल्यानंतरही अनेक देशी बँका विठ्ठलदासांकडे सल्लामसलतीसाठी येत असत व बँकेतील उच्च दर्जाच्या अधिकाऱ्यांची नेमणूक करताना विठ्ठलदासांकडून शिफारसी मागवत असत.

गेल्या शतकाच्या पहिल्या काही वर्षांत स्पिसी बँकेचा केवढा लौकिक व दबदबा होता, याची आता कल्पनाही येणार नाही. स्पिसी बँकेच्या चढत्या काळात तिचे उदाहरण डोळ्यापुढे ठेवून सयाजीराव महाराजांनी 'द बँक ऑफ बरोडा' स्थापन केली. विठ्ठलदास हे गायकवाडांचे प्रजाजन होते व बरोडा बँकेची योजना त्यांनीच केली होती. बरोडा बँकेचे पहिले अध्यक्ष विठ्ठलदासच होते. नंतर म्हैसूर संस्थानाने 'म्हैसूर बँक' स्थापन केली. म्हैसूरचे दिवाण विश्वश्वरय्या यांची व विठ्ठलदासांची घनिष्ठ मैत्री होती. त्यामुळे बँकेची जबाबदारी विठ्ठलदासांकडेच सोपवावी, असा संस्थानाचा विचार होता. पण विठ्ठल-दासांपाशी वेळ नसल्याने ते काम त्यांनी स्वीकारले नाही.

(३)

सहकाराची चळवळ, तिच्यातील अनेक दोषांसह, आता चांगली रुजली आहे. गावोगावी सहकारी पतपेढ्या आणि सहकारी बँका निर्माण झाल्या आहेत. त्यांना अर्थपुरवठा करण्यासाठी जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका आहेत. या सर्वांवर शिखरस्थ अशी 'महाराष्ट्र राज्य सहकारी बँक' आहे. (या बँकेचे संचालक मंडळ गेल्या वर्षी सरकारने बरखास्त केले.) ह्या आज झालेल्या विस्ताराचे बीज विठ्ठलदास ठाकरसी यांनी पेरले हे आज अगदी थोड्या लोकांनाच माहीत असेल. त्याची हकीकत आता पाहू.

१९०५ साली, कर्झनच्या कारकिर्दीत, सहकारी संस्थांचा कायदा करण्यात आला व निरनिराळ्या प्रांतांत सहकारी खाती स्थापन होऊन 'सहकार नियंत्रक' (रजि-स्ट्रार्स) नेमण्यात आले. मुंबई प्रांतातील नियंत्रक जेम्स मॅक्नील नावाचा उत्साही मनुष्य होता व आपल्या प्रांतात समर्थ अशी सहकारी चळवळ उभी राहावी, ही त्याची इच्छा होती. त्याने या कामी विठ्ठलदास यांची मदत मागितली. तेव्हा विठ्ठलदासांनी आपल्या नऊ मित्रांसह, प्रत्येकी रु. २००० भांडवल घालून, रु. २०,००० इतक्या भांडवलाची 'को-ऑपरेटिव्ह अर्बन बँक' मुंबईत स्थापन केली. याच काळात विठ्ठलदासांचे मित्र लल्लूभाई सामलदास हे अहमदाबाद व खेडा जिल्ह्यांतून प्राथमिक सहकारी पतपेढ्या चालू करण्याच्या कामात गुंतले होते.

अशा वेळी दोघांच्याही मनात आले की, ग्रामीण स्तरावरील सहकारी पतपेढ्यांना निधी पुरविण्यासाठी एक सक्षम मध्यवर्ती सहकारी बँक काढली पाहिजे. १९०६ साली, काँग्रेसच्याच बरोबर, कलकत्त्याला औद्योगिक परिषद भरली होती व विठ्ठलदास त्या परिषदेचे अध्यक्ष होते. त्या वेळी त्यांना कळले की, इंग्लंडमधील एक बडा भांडवलदार देशाच्या पातळीवर अशी एक बँक काढण्याच्या खटपटीत आहे. विठ्ठलदास व लल्लूभाई यांनी त्या भांडवलदाराची भेट घेतली तेव्हा त्यांच्या ध्यानी आले की, हिंदी भांडवलाला बाजूला ठेवून परक्यांची भर करण्याचा हा कट आहे. तेव्हा या दोघांनी मुंबई प्रांतासाठी प्रांतिक सहकारी बँक काढण्याची योजना तयार केली. या योजनेतील सूत्र असे होते की, जेवढे भांडवल






जमेल त्यांच्या पाचपट रक्कम डिबेंचर्स विकून उभी करावयाची. या डिबेंचर्सच्या व्याजाची हमी मुंबई सरकारने द्यावयाची.

यानंतर सिमल्याला प्रांतिक 'सहकार नियंत्रकांची' परिषद भरली. त्या परिषदेला लल्लूभाई गेले होते. त्याही वेळी हिंदुस्थान सरकारच्या मदतीने एक 'अखिल हिंदुस्थान सहकारी बँक' काढण्याचा हेतू मनात धरून इंग्लंडच्या भांडवलदारांचे एक मंडळ आले होते. त्या परिषदेचा अध्यक्ष असणारा सरकारी अधिकारी रॉबर्ट कॅरिल याने लल्लूभाईंची त्या भांडवलदार मंडळींशी गाठ घालून दिली. पण ह्या ब्रिटिश भांडवलदारांनी लल्लूभाईंच्या ताकास तूर लागू दिला नाही. त्याच परिषदेत लल्लूभाईंनी आपण व विठ्ठलदास यांनी तयार केलेली योजना सादर केली. त्यावर साधक-बाधक चर्चाही झाली. पण इंग्रज अधिकाऱ्यांनी लल्लूभाईंना परोक्षत रीतीने सुचविले की, ही योजना हिंदुस्थान सरकार मान्य करणार नाही.

त्यानंतर १९०९ सालच्या जूनमध्ये मुंबईच्या एका अधिकाऱ्याने विठ्ठलदास व लल्लूभाई यांची गाठ ब्रिटिश भांडवलदारांच्या प्रतिनिधीशी घालून दिली. आता हे ब्रिटिश भांडवलदार हिंदी भांडवलदारांना बरोबर घेऊन संयुक्तपणे एक सहकारी बँक काढायला तयार होते. बँकेचे उद्दिष्ट खेड्यापाड्यातील शेतकऱ्यांना भांडवल पुरविण्याचे होते. पण असे दिसून आले की, ब्रिटिश भांडवलदार स्वत: कोणतीच जोखीम घ्यायला तयार नव्हते. सरकारी मदतीवर त्यांचा सगळा भरवसा होता आणि शेतकऱ्याला मदतीचा हात देण्यापेक्षा त्याच्याकडील पैसा ओढण्यातच त्यांना स्वारस्य होते. यानंतर विठ्ठलदास व लल्लूभाई यांनी मुंबई सरकार व मध्यवर्ती सरकार यांना पत्रे लिहून ब्रिटिश भांडवलदारांच्या योजनेवरील आपले आक्षेप कळविले व सरकारनेही त्या योजनेचा पाठपुरावा केला नाही.

मुंबईचा तेव्हाचा गव्हर्नर सर जॉर्ज सिडनॅहम क्लार्क याच्या बरोबर विठ्ठलदास यांचा घनिष्ठ संबंध होता. त्यामुळे विठ्ठलदासांनी ठरविले की, केवळ मुंबई प्रांतापुरतीच 'प्रॉव्हिन्शिअल को-ऑपरेटिव्ह बँक' स्थापन करावयाची. या बँकेचे मूळ भांडवल रु. ५,००,००० इतके असेल. बँक रु. २०,००,००० इतकी रक्कम डिबेंचर्स विकून उभी करील. यातून गावोगावच्या सहकारी पतपेढ्या/बँका यांना कर्जे देण्यात येतील. या डिबेंचर्सची हमी सरकारने घ्यावी. (म्हणजे लोक ती खळखळ न करता विकत घेतील.) यावर सरकारने आक्षेप घेतला की, इथे शेअर–होल्डर्स कोणतीच जोखीम घेताना दिसत नाहीत. तेव्हा विठ्ठलदासांनी आपल्या योजनेत सुधारणा करून असा नियम केला, की शेअर होल्डर्स कधीच सहा टक्क्यांपेक्षा जास्त डिव्हिडंड घेणार नाहीत. सहा टक्के डिव्हिडंड दिल्यावर जी अतिरिक्त रक्कम उरेल, ती ऋणको सहकारी बँकांना वाटून देण्यात येईल. या नंतर मध्यवर्ती सरकाराकडे मुंबई सरकारने बँकेची शिफारस केली व मध्यवर्ती सरकारने ही बँक काढायला फेब्रुवारी १९११ मध्ये मंजुरी दिली. बँकेचे नाव 'सेन्ट्रल ॲग्रिकल्चरल बँक' असे ठेवण्यात आले.

या बँकेच्या संचालक मंडळात विठ्ठलदास, गोपाळ कृष्ण गोखले, लल्लूभाई सामलदास इत्यादी मंडळी होती. शेअर्स विकले जाऊन पाच लाखांचे भांडवल जमा झाले. त्यानंतर शेतकऱ्यांना कर्ज देण्याची वेळ आली. विठ्ठलदासांनी नीरा नदीच्या खोऱ्यातील ऊस उत्पादकांना कर्ज देण्याची योजना केली. ह्या कर्जाची एकूण रक्कम मोठी असणार व त्या कर्जांची वसुली हप्त्या-हप्त्याने होणार याचा अंदाज घेऊन विठ्ठलदास यांनी सरकारकडून दोन मामलेदारांची नेमणूक सहकारी सं◌ ा उभारणे, त्यांना कर्जे देणे व ती वसूल करणे या कामासाठी करून घेतली.

सुरुवातीपासून विठ्ठलदास या बँकेच्या संचालक मंडळाचे अध्यक्ष होते व त्यांच्या मृत्यूपर्यंत ते त्या जागी होते. लल्लूभाई यांचे सुपुत्र वैकुंठलाल हे बँकेचे कार्यकारी संचालक होते. वैकुंठभाई यांनी सहकारी चळवळीचे नेतृत्व दीर्घकाळपर्यंत केले. १९३७ साली मुंबई प्रांतात काँग्रेसचे मंत्रिमंडळ स्थापन झाले. त्यात ते अर्थमंत्री होते. (वैकुंठभाईंचे बंधू गगनविहारीलाल हे अनेक वर्षे भारताचे अमेरिकेतील राजदूत होते.) त्या काळी इलाख्यातील सहकारी संस्थांच्या परिषदा भरत असत. त्यात विठ्ठलदासांचा महत्त्वाचा सहभाग असे. या परिषदांतील अनुभवावरून विठ्ठलदासांना वाटले की, सहकारी चळवळीतील कार्यकर्त्यांना सहकाराचे पद्धतशीर शिक्षण

मिळाले पाहिजे. यासाठी त्यांनी 'को-ऑपरेटिव्ह इन्स्टिट्यूट' नावाची प्रशिक्षण संस्था काढली. विठ्ठलदासांच्या मृत्यूनंतर त्यांचेच नाव या संस्थेला देण्यात आले.

(४)

विठ्ठलदास यांचा मुख्य उद्योग कापडाच्या गिरण्या आणि कापडाचा व्यापार होता. १९ व्या शतकाच्या अखेरच्या दशकात व विसाव्या शतकाच्या पहिल्या दशकात हिंदुस्थानातून चीनला मोठ्या प्रमाणात कापड आणि सूत निर्यात केले जाई. देशात होणारा खप व चीनशी चाललेला कापडाचा व्यापार यांच्यावर कापड उद्योगाची भरभराट अवलंबून होती. १८६५ साली देशात १३ गिरण्या होत्या. त्यांची संख्या वेगाने वाढून १९०५ साली १९७ गिरण्या अस्तित्वात होत्या. १९०५ साली बनारसला काँग्रेसचे अधिवेशन गोपाळ कृष्ण गोखले यांच्या अध्यक्षतेखाली भरले होते. त्याच अधिवेशनासोबत 'औद्योगिक परिषद' भरली होती. तिथे वाचलेल्या निबंधात विठ्ठलदासांनी ही माहिती दिली होती. इतक्या गिरण्या होत्या तरी देशात हाताने कापड विणण्याचा उद्योगही जोरात होता. विठ्ठलदासांनी दिलेली आकडेवारी अशी आहे : गिरण्यांतून ५८ कोटी पौंड वजनाचे सूत तयार होते. त्यापैकी २३।। कोटी पौंड सूत चीन आणि इतर देशांना निर्यात होते. १३।। कोटी पौंड सूत गिरण्या वापरतात व त्याचे कापड विणतात. २१ कोटी पौंड सूत हे हातविणीसाठी देशातच वापरले जाते. खेरीज ३ कोटी पौंड सूत परदेशातून आयात करून हातविणीसाठी वापरले जाते. विठ्ठलदासांचे म्हणणे असे होते की, हिंदुस्थानात कापूस पिकतो, हिंदुस्थानातच कापडाची मोठी विक्री होते; अशा स्थितीत कापड-उद्योगाला काहीच धोका असण्याचे कारण नाही.

मात्र २० व्या शतकाच्या पहिल्या दशकात व नंतरही हिंदी कापडाच्या चीनमधील खपाला जपानकडून होणाऱ्या स्पर्धेला तोंड द्यावे लागले. याला एक कारण असे होते की, जपान-सरकारने तेथील कापड गिरण्यांना फार सवलती दिल्या होत्या. जपानमध्ये कापूस पिकत नाही. जपान हिंदुस्थानातून कापूस आणतो. जपानी जहाजांना जपानी सरकार इतक्या मोठ्या प्रमाणात अनुदान देई की, ही जहाजे अगदी कमी दरात कापसाची वाहतूक करीत. जपानमध्ये कापडाची आयात करण्यास बंदी होती. जपानी कापड–गिरण्या देशात चढ्या भावाने कापड विकीत आणि खोट सोसून चीनला कमी दरात कापड निर्यात करीत. साहजिकच चीनच्या बाजारात जपान्यांशी चढा-ओढ करणे हिंदी गिरण्यांना अवघड जाई.

जपानी सरकारच्या धोरणावर हिंदुस्थानच्या इंग्रजी राज्यकर्त्यांचे कोणतेच नियंत्रण असणे शक्य नव्हते. पण भारतीय कापड उद्योगाला मदत करणे सरकारला शक्य होते. सरकारने तसे तर केले नाहीच; पण १८९३ सालापासून सरकारने चलनाच्या बाबतीत जे धोरण अवलंबिले त्यामुळे केवळ कापडाच्याच नव्हे तर सर्वच मालाच्या निर्यातीला जबरदस्त ठोकर बसली. हिंदुस्थानचे नाणे रुप्याचे होते व ब्रिटिश पौंड सोन्याचा होता. १८८० सालानंतर चांदीचे उत्पादन जगभरातच वाढल्यामुळे ब्रिटिश पौंडाच्या तुलनेत रुपयाचे अवमूल्यन होऊन हिंदुस्थानाची निर्यात वाढली होती. साहजिकच इंग्लंडमधील भांडवलदारांनी याविरुद्ध हाकाटी केली. त्यामुळे १८९३ साली हिंदुस्थान सरकारने रुपयाचे मूल्य कृत्रिम रीतीने वाढविले. त्यांनी रुप्याची नाणी पाडणेच बंद केले आाि १० पेन्सला १ रुपया असा जो दर जागतिक बाजारात झाला होता तो १६ पेन्सला १ रु. असा वाढविला. साहजिकच भारतीय वस्तू जागतिक बाजारात महाग झाल्या.

विठ्ठलदास हे 'गिरणी मालक संघा'चे अध्यक्ष होते. तसेच औद्योगिक परिषदेतही ते निरनिराळ्या अधिकारांवर वेळोवेळी होते. त्यामुळे रुपयाचे जे कृत्रिम मूल्यवर्धन सरकारने केले होते, त्याविरुद्ध त्यांनी वारंवार भाषणे केली होती. विठ्ठलदास हे 'इंपिरियल कौन्सिल' (मध्यवर्ती विधिमंडळ) याचेही सभासद होते. तिथे त्यांनी या विरोधात ठराव मांडले होते. पण कशाचाही काही परिणाम झाला नाही. खेरीज सरकार निरनिराळ्या सबबींखाली कापड-उत्पादनावरील कर वाढवून कापड महाग करीत असे, ते निराळेच. वसाहतवादी सरकार भारतीय अर्थव्यवस्थेला घातक अशी धोरणे जाणीवपूर्वक राबवत असे, याची उदाहरणे विठ्ठलदासांच्या चरित्रात ठिकठिकाणी वाचायला मिळतात.

१९०५ साली बंगालची फाळणी झाली व त्यानंतर स्वदेशी चळवळीची वावटळ उठली. आम जनतेने परदेशी-विशेषतः इंग्लंडमध्ये तयार झालेल्या वस्तूंवर बहिष्कार

टाकला. साहजिकच देशी कापड-गिरण्यांना त्याचा फायदा मिळाला. त्या वेळी मुंबई सरकारने विठ्ठलदासांना या चळवळीच्या कापड-उद्योगावर झालेल्या परिणामाविषयी विचारले होते. त्यावर विठ्ठलदासांनी लिहिले होते. 'या चळवळीमुळे देशी कापडाची मागणी अफाट वाढली असून किमतीही भरमसाट चढल्या आहेत. गेल्या दीड-दोन महिन्यांत कलकत्त्याच्या व्यापाऱ्यांनी मुंबई प्रांतातून एक लाख गासड्या कापड विकत घेतले. गेल्या वर्षात गिरण्यातून पाच ते नऊ हजार नवे माग बसविण्यात आले व यंदा तेवढेच आणखी भाग बसविण्यात येतील. मुंबईतील गिरण्यांना होत असलेल्या नफ्यात प्रचंड वाढ झाली आहे..... पण ही स्वदेशी चळवळ फार काळ टिकेल असे मला वाटत नाही.'

याच सुमाराला मुंबईत विजेचा वापर सुरू झाला. वाढती मागणी व अंधार पडल्यावरही काम करता येण्याजोगी परिस्थिती यामुळे मुंबईतील गिरण्यांच्या पाळ्या लांबवण्यात आल्या. मुंबईतील कापड-उद्योगाची ही भरभराट लँकेशायर (इंग्लंड)मधील कापड गिरण्यांच्या मालकांना पाहवेना. त्यांना मुंबईतील गिरणी-कामगारांचा कळवळा आला. त्यांनी भारतमंत्री (जॉन मोर्ले) यांच्यामागे मुंबईतील 'घाम गाळणाऱ्या गुलामां'च्या स्थितीची चौकशी झाली पाहिजे, असा ससेमिरा लावला. शेवटी 'इन्डियन फॅक्टरी लेबर कमिशन' नेमण्यात आले. त्यावर मुंबई चेंबर ऑफ कॉमर्स व गिरणी-मालक-संघ यांचे संयुक्त-प्रतिनिधी म्हणून विठ्ठलदासांची नेमणूक झाली. या मंडळात सहा गोरे व तीन हिंदी प्रतिनिधी होते.

या मंडळाकडे केवळ कापडगिरण्यांच्याच पाहणीचे काम नव्हते, तर इतरही अनेक उद्योगांतील मजुरांच्या स्थितीची पाहणी या मंडळाने केली. नोव्हेंबर १९०७ मध्ये मंडळाचे काम सुरू होऊन मे १९०८ मध्ये मंडळाचा अहवाल सरकारला देण्यात आला. या अहवालाचा मथितार्थ असा होता की, (१) इंग्लंडमध्ये मजुरांच्या कल्याणासाठी जसे कायदे केले आहेत, तसे कायदे हिंदुस्थानात करावेत अशी काहीच जरुरी नाही. दोन्ही ठिकाणची परिस्थिती भिन्न आहे. (२) कारखान्यातील स्त्री किंवा पुरुष मजुरांवर त्यांना न पेलेल इतका कामाचा बोजा पडतो आहे, असे आढळत नाही. किंबहुना, शेतमजूर आणि स्वयं-मजुरी करणाऱ्यांपेक्षा कारखान्यातील मजुरांचे आरोग्य खूपच चांगले आहे. (३) सध्या कारखान्यात एका पाळीला जितके तास काम करावे लागते त्याच्यापेक्षा कमी तासांची एक पाळी करावी, याला काही कारण दिसत नाही. (त्या काळात एक पाळी १२ तासांची होती.) अशा रीतीने हे मंडळ नेमण्यामागे लँकेशायरच्या भांडवलदारांचा जो हेतू होता, तो सिद्धीस गेला नाही.

'फॅक्टरी लेबर कमिशन'वर विठ्ठलदास यांनी जे काम केले ते व मुंबईची नगरपालिका, मुंबई प्रांताचे विधिमंडळ येथील त्यांची कामगिरी पाहून २५ जून १९०८ (बादशहा सातवा एडवर्ड याचा वाढदिवस) या दिवशी इंग्रज सरकारने त्यांना 'सर' ही पदवी देऊन त्यांचा गौरव केला. हा सन्मान त्यांना लाभल्याबद्दल व्हॉईसरॉय लॉर्ड मिंटो, बडोद्याचे राजे सयाजीराव, मुंबईचे गव्हर्नर सर जॉर्ज क्लार्क यांच्यापासून तो मुंबईतील सामान्य नागरिकांपर्यंत अनेकांनी पत्रे व तारा पाठवून त्यांचे अभिनंदन केले.

## (५)

भारतीय नागरिकांना देशाच्या कारभारात शिरकाव मिळावा यासाठी इंग्रजी राज्यकर्त्यांनी काही वाटा आखून दिल्या होत्या. त्याची सुरुवात १८६० सालापासूनच झाली होती. त्या वेळी मध्यवर्ती कायदेमंडळ व प्रांतिक कायदेमंडळ यांच्यावर प्रतिष्ठित हिंदी नागरिकांची नेमणूक करण्यात येऊ लागली. रिपनच्या कारकिर्दीत स्थानिक स्वराज्य संस्था उभ्या करण्यात आल्या. त्यानंतर प्रांतिक कायदेमंडळातील काही जागा निवडणुकांनी भराव्यात अशी सुधारणा झाली. अर्थात निवडणुकीत मतदार होण्याचा अधिकार फारच मर्यादित होता. जे प्रखर राष्ट्रवादी होते त्यांच्या मते हा सर्व इंग्रज सरकारने उभा केलेला देखावा होता. याउलट, प्रागतिक विचाराच्या लोकांना आशा वाटे की, देशाच्या कारभारात भाग घेण्याच्या या वाटा हळूहळू रुंदावत जातील व कालान्तराने देशाची संपूर्ण व्यवस्था लोकप्रतिनिधींच्या हवाली होईल. देशाच्या अनेक मान्यवर पुढाऱ्यांनी आपल्या कारकिर्दीत केव्हा ना केव्हा सरकारने घालून दिलेल्या या मार्गांनी वाटचाल केल्याचे आढळून येते. सर फेरोजशहा मेहता, सुरेन्द्रनाथ बॅनर्जी, लोकमान्य टिळक, मोतीलाल व जवाहरलाल नेहरू,

सरदार पटेल आणि सुभाषचंद्र बोस या सर्वांनी आपापल्या शहरातील नगरपालिकांतून आपल्या सार्वजनिक कार्याला सुरुवात केली.

विठ्ठलदासांचे वडील दामोदर हे मुंबई महानगर पालिकेचे (म.न.पा.) सभासद होते. त्या काळी ज्यांना 'जस्टिस ऑफ पीस' हा किताब मिळालेला असे, त्यांचा एक मतदारसंघ होता. त्यातून 'म.न.पा.'वर निवडून जाता येई. फेरोजशहा हे याच मतदार-संघातून निवडले जात. १८९७ साली विठ्ठलदास यांना 'जस्टिस ऑफ पीस' हा किताब मिळाला. १८९८ साली त्यांनी महा-नगरपालिकेच्या भुलेश्वर भागातून निवडणूक लढविली. तेव्हापासून १९०८ सालापर्यंत ते महानगरपालिकेचे सभासद होते. शेवटच्या वर्षी म्हणजे १९०७-०८ साली ते म.न.पा.चे अध्यक्ष-म्हणजे आताच्या भाषेत महापौर होते. विठ्ठलदास महापौरपदासाठी उभे होते तेव्हा त्यांच्या विरोधात फेराजशहा गटाने सीताराम हरी दीक्षित यांना उभे केले होते. पण दीक्षित यांचा पराभव झाला. त्या काळी म.न.पा.वर सरकारने नेमलेले प्रतिनिधी बरेच असत. त्यांनी १९०७-०८ साली फेरोजशहांचा नक्षा उतरवण्याचा निश्चय केला होता. त्यामुळे विठ्ठलदासांना हा मान मिळाला. विठ्ठलदासांच्या कारकिर्दीतील महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्या वर्षी (१९०७ साली) मुंबईत विजेची ट्रॅम सुरू झाली.

महानगरपालिकेवर (म.न.पा.) असतानाच मुंबई सरकारने १९०३ साली त्यांची नेमणूक प्रांतिक विधि-मंडळावर केली. त्या वेळी त्यांच्याबरोबर प्रांतिक विधि-मंडळावर सर इब्राहिम रहिमतुल्ला, सर फेरोजशहा मेहता, सीताराम हरी दीक्षित, दाजी आबाजी खरे, चिमण-लाल सेटलवाड इत्यादी नामवंत मंडळी होती. १९०३ पासून १९०९ पर्यंत ते सातत्याने प्रांतिक विधिमंडळावर होते. या काळात त्यांनी पुष्कळ कामे केली. पण त्यांतील महत्त्वाचे काम म्हणजे त्यांनी 'वाणिज्य शाखे'च्या शिक्षणाची सोय सरकारने केली पाहिजे, याचा आग्रह विधिमंडळात धरला. त्यासाठी अभ्यासक्रम तयार केला. या सततच्या पाठपुराव्याला यश येऊन १९१२ साली मुंबईला वाणिज्य शिक्षण देणारे सिडनहॅम कॉलेज सरकारने सुरू केले.

१९०९ साली मोर्ले-मिंटो सुधारणा अमलात आल्या. त्यानुसार मुंबई विधिमंडळाला मध्यवर्ती विधिमंडळावर दोन सभासद पाठविण्याचा अधिकार मिळाला. १९१० साली ही निवडणूक झाली. दोन जागांसाठी गोपाळ कृष्ण गोखले, विठ्ठलदास व चिमणलाल सेटलवाड असे तिघे उमेदवार होते. पैकी पहिले दोघे निवडून आले. १९१२ सालापर्यंत विठ्ठलदास मध्यवर्ती विधिमंडळावर होते. या काळात त्यांनी सरकारच्या आर्थिक धोरणाविषयी अतिशय अभ्यासपूर्ण व्याख्याने दिली. रुपयाच्या कृत्रिम मूल्यवाढीला त्यांचा विरोध होता, हे आपण पाहिलेच आहे. गोखल्यांनी सक्तीच्या प्राथमिक शिक्षणासंबंधी जे ठराव मांडले, त्या सर्वांना त्यांनी जोराचा पाठिंबा दिला. पण सरकारने नेमलेल्या प्रतिनिधींचे विधिमंडळात बहुमत असल्याने हे सर्व ठराव फेटाळले गेले. पुढे १९२१ साली त्यांची गिरणी-मालक-संघातर्फे पुनः मध्यवर्ती विधिमंडळा-वर निवडणूक झाली. मृत्यूपर्यंत ते विधिमंडळाचे सभासद होते.

## (६)

विठ्ठलदास यांची पहिली पत्नी लीलाकुंवर १८९९ साली वारली. त्यांनी दुसरे लग्न प्रेमकुंवर नावाच्या मुलीशी केले. तिचा मृत्यू १९१७ साली झाला. त्यानंतर प्रेमलीलाबाईंशी त्यांचा विवाह १९१९ साली झाला. स्वतः विठ्ठलदास १९२२ सालच्या ऑगस्टमध्ये वारले. त्यांना आंत्रव्रणाचा आजार झाला. तो वेगाने वाढला. शस्त्रक्रिया करावी लागली. पण या उपचारांचा काही उपयोग झाला नाही. प्रेमलीलाबाई नंतर बरीच वर्षे हयात होत्या. विठ्ठल-दासांना मूलबाळ झालेच नाही. त्यांच्या निधनानंतर ठाकरसी उद्योगाचे प्रमुखत्व विठ्ठलदासांचे बंधू माधवजी यांच्याकडे गेले. माधवजींना दोन मुलगे. मोठा कृष्णराज व धाकटा, विख्यात क्रिकेटपटू, विजय मर्चंट.

स्वातंत्र्य मिळाल्यानंतर इंग्रजी राजवटीच्या काळाचे जे इतिहास लिहिले गेले, त्या इतिहासात साहजिकच स्वातंत्र्यासाठी काँग्रेसच्या प्रमुखत्वाने जी चळवळ झाली तिच्यावर भर देण्यात आला. महात्मा फुले किंवा डॉ. आंबेडकर अगर रामस्वामी नायकर यांच्या नेतृत्त्वा-खाली शूद्रातिशूद्रांनी जे लढे केले त्यांना महत्त्व या समाज-विभागांनी आपले राजकीय सामर्थ्य प्रकट केल्यानंतर येऊ लागले. स्वातंत्र्यपूर्व काळात जे औद्योगीकरण झाले,

त्याविषयी इतिहासाच्या क्रमिक पुस्तकातून जेमशेटजी टाटांच्या उल्लेखाखेरीज काहीच असत नाही. स्वातंत्र्याच्या चळवळीतील एका विशिष्ट प्रवाहावर जो एकांगी भर देण्यात आला, त्यामुळे इंग्रजकालीन घडामोडींच्या फार मोठ्या भागाकडे दुर्लक्ष झाले. तीच उपेक्षा मुंबई, अहमदाबाद, नागपूर येथील वस्त्रोद्योग व कापड-गिरण्या यांच्या वाट्याला आली. आता आपण विठ्ठलदास यांची जी कामगिरी पाहिली, त्यांच्या औदार्याची उदाहरणे आपल्या समोर आली, त्यावरून कळून येईल की, इंग्रजांच्या काळात जो भांडवलदारवर्ग उदयाला आला, त्याचाही अभ्यास व्हायला हवा.

☆☆☆

---



अनुक्रमणिका

## लेखकांचा परिचय

❋ **श्री. बाबूराव चंदावार**
समाजसेवक आणि सामाजिक प्रश्नांचे अभ्यासक
***पत्ता :–*** सईनगर २, डी. १, फ्लॅट – १३, सिंहगडरोड, पुणे – ४११ ०३०.

❋ **प्रा. व्ही. डी. गायकवाड**
विभागप्रमुख, पदवी व पदव्युत्तर राज्यशास्त्र विभाग, शिवाजी महाविद्यालय, उदगीर
***पत्ता :*** राज्यशास्त्र विभाग, शिवाजी महाविद्यालय, उदगीर – ४१३ ५१७. जि. लातूर (महाराष्ट्र)
भ्रमणध्वनी : ९४२३३४३४७३.

❋ **प्राचार्य डॉ. पंडितराव पवार**
मराठीचे निवृत्त प्राध्यापक. एम. ए. पीएच. डी. (मराठी); नाशिक जिल्हा मराठा विद्याप्रसारक समाज, नाशिक या संस्थेत ३० वर्षे प्राचार्य. पुणे विद्यापीठाचा उत्कृष्ट प्राचार्य म्हणून पुरस्कार. साहित्य व शिक्षण यांवर लेखन.
***पत्ता :–*** ६, ऋषिराज पार्क, अरिहंत नर्सिंग होमजवळ, गंगापूर रोड, नाशिक –४२२ ०१३.
भ्रमणध्वनी : ९४२३१८१०८७.

❋ **प्रा. माधव चोले**
राज्यशास्त्राचे अभ्यासक, देगलूर महाविद्यालय, देगलूर.
***पत्ता :*** देगलूर महाविद्यालय, देगलूर. भ्रमणध्वनी : ९९७०५६३३८५.

❋ **डॉ. श्रीपाद भालचंद्र जोशी**
प्रख्यात संवाद-माध्यमतज्ज्ञ असून राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठाच्या जनसंवाद विद्या विभागचे माजी विभागप्रमुख व गोखले संवाद व माध्यम संशोधन संस्थेचे माजी संचालक आणि संवादशास्त्र-जनसंवाद-माध्यम-पत्रकारिता यांबाबतच्या अनेक ग्रंथांचे लेखकही आहेत. या ज्ञानशाखेतील अनेक अभ्यासक्रमांची त्यांनी रचना केली असून जनसंवाद विद्या अभ्यासमंडळाचे ते अध्यक्षही राहिले आहेत.
***पत्ता :–*** १०५, संकल्प सहनिवास, ४० खरे टाऊन, धरमपेठ, नागपूर - ४४० ०१०.

❋ **प्रा. डॉ. आशुतोष पाटील**
सहायक प्राध्यापक, तौलनिक भाषा व वाङ्मय विभाग, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव.
***पत्ता :*** उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव – ४२५ ००१. भ्रमणध्वनी : ९८२३३६५१९०.

❋ **प्रा. श्री. मा. भावे**
माजी प्रपाठक व विभागप्रमुख, गणित विभाग, नौरोजी वाडिया कॉलेज, पुणे; गणित व तत्त्वज्ञान या विषयांत पीएच्.डी. व पदव्युत्तर संशोधन; शिक्षकचळवळीत सहभाग; शिक्षण, गणित व तत्त्वज्ञान या विषयांवर २५ शोधनिबंध प्रसिद्ध.
***पत्ता :*** ३३/२०, ४ थी गल्ली, प्रभात रोड, पुणे – ४११ ००४. दूरध्वनी : (०२०) २५६७४०९३.

## लेखकांस आवाहन

'नवभारत' मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाच आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण 'नवभारता' कडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी, अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील, ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यांसह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही, याची स्पष्ट कल्पना 'नवभारत' च्या संपादकांना द्यावी.

४. 'नवभारत' मध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो. त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात 'नवभारत' मध्ये येईल किंवा येणार नाही, हे यथावकाश कळविले जाईल, याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

- संपादक मंडळ

